दादा भगवान कथित

# अहिंसा

क्रोध
मान
**कषाय**
माया
लोभ











Marathi

दादा भगवान कथित

# अहिंसा

मूळ गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

मराठी अनुवाद : महात्मागण

**प्रकाशक** : **अजीत सी. पटेल**
**दादा भगवान विज्ञान फाउन्डेशन,**
1, वरूण अपार्टमेंट, 37, श्रीमाळी सोसायटी,
नवरंगपुरा पुलिस स्टेशनच्या समोर, नवरंगपुरा,
अहमदाबाद - 380009, Gujarat, India.
**फोन :** +91 79 3500 2100, +91 9328661166/77



**प्रथम आवृत्ति** : 1000 प्रती नोव्हेंबर, 2018
**नवीन रीप्रिंट** : 1500 प्रती जानेवारी, 2025

**भाव मूल्य** : 'परम विनय' आणि
'मी काहीच जाणत नाही', हा भाव!

**द्रव्य मूल्य** : 50 रुपये

**मुद्रक** : अंबा मल्टीप्रिंट
एच.बी.कापडिया न्यू हाइस्कूलच्या समोर,
छत्राल-प्रतापपुरा रोड, छत्राल,
ता. कलोल, जि. गांधीनगर-382729, गुजरात
**फोन :** +91 79 3500 2142

**ISBN/eISBN :** 978-93-87551-23-7

**Printed in India**

# त्रिमंत्र





नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो ऊवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद





## दादा भगवान कोण ?

जून 1958 संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्भुत आश्चर्य! एका तासात त्यांना विश्वदर्शन लाभले! मी कोण ? भगवंत कोण ? जग कोण चालवित आहे ? कर्म म्हणजे काय ? मुक्ती कशाला म्हणतात ? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षुनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्भुत ज्ञान प्रयोगाद्वारे! त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण ?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोकाचे' नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! मी स्वत: भगवान नाही. माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

## आत्मज्ञान प्राप्तीची प्रत्यक्ष लींक

परम पूज्य दादा भगवान (दादाश्री) यांना 1958 मध्ये आत्मज्ञान प्रकट झाले. त्यानंतर 1962 ते 1988 पर्यंत देश-विदेश परिभ्रमण करून मुमुक्षुंना सत्संग आणि आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत.

दादाश्रींनी आपल्या हयातीतच आत्मज्ञानी पूज्य डॉ. नीरूबहन अमीन (नीरूमा) यांना आत्मज्ञान प्राप्त करवून देण्याची ज्ञानसिद्धी प्रदान केली होती. दादाश्रींच्या देहविलयानंतर नीरूमा त्यांच्याप्रमाणेच मुमुक्षुंना सत्संग व आत्मज्ञान प्राप्ती निमित्त भावाने करवित असत.

आत्मज्ञानी पूज्य दीपकभाई देसाई यांना सुद्धा दादाश्रींनी सत्संग करण्याची सिद्धी प्रदान केली होती. वर्तमानात पूज्य नीरूमांच्या आशीर्वादाने पूज्य दीपकभाई देश-विदेशात निमित्तभावाने आत्मज्ञान प्राप्ती करवित आहेत.

या आत्मज्ञान प्राप्तीनंतर हजारो मुमुक्षु संसारात राहून, सर्व जबाबदाऱ्या सांभाळत असताना सुद्धा आतून मुक्त राहून आत्मरमणतेचा अनुभव घेत आहेत.

# निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञाना संबंधीत जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषायांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये विशेष लक्ष ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रूटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानार्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण लिहिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तके

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं, ग्रंथ)
10. भावना सुधारे जन्मोजन्म
11. कर्माचे विज्ञान
12. पाप-पुण्य
13. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
14. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
15. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
16. मानव धर्म
17. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
18. सेवा-परोपकार
19. दान
20. त्रिमंत्र
21. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
22. चमत्कार
23. सत्य-असत्याचे रहस्य
24. वाणी, व्यवहारात (सं)
25. पैशांचा व्यवहार (सं)
26. क्लेश रहित जीवन
27. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
28. प्रेम
29. गुरू-शिष्य
30. अहिंसा
31. आप्तवाणी - 1 ते 6
36. आत्मसाक्षात्कार
37. जगत् कर्ता कोण ?
38. कर्माचा सिद्धांत

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1 से 3)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

**★ दादा भगवान फाउन्डेशनद्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेतसुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहेत. वेबसाइट www.dadabhagwan.org वरसुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता.**

**★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि इंग्रजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित होत आहे.**

# संपादकीय

हिंसेच्या समुद्रात हिंसाच असते, परंतु हिंसेच्या समुद्रात अहिंसा प्राप्त करायची असेल तर परम पूज्य दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेली अहिंसेची वाणी वाचून, मनन करून, फॉलो करण्यात आली तरच ते शक्य होईल. बाकी, खोलवरची स्थूल अहिंसा पाळणारे तर बरेच लोक आहेत. पण सूक्ष्म, सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम अहिंसा समजणे हेच कठीण आहे. मग तिच्या प्राप्तीचा प्रश्नच कुठे राहिला?

स्थूल जीवांची हिंसा तसेच सूक्ष्मातिसूक्ष्म जीवांची हिंसा, उदा. वायुकाय-तेउकाय इत्यादीपासून ते थेट भावहिंसा, भावमरणापर्यंतची खरी यथार्थ समज जर नसेल तर ती परिणामकारक होत नाही, आणि फक्त शब्दातच किंवा क्रियेतच अहिंसा अडकून राहते.

हिंसेच्या यथार्थ स्वरूपाचे दर्शन तर जे हिंसेला संपूर्णपणे ओलांडून अहिंसक पदावर बसलेले आहेत तेच करू शकतात आणि दुसऱ्यांनाही करवू शकतात! ते 'स्वत:' जेव्हा 'आत्मस्वरूपात' स्थित होतात, तेव्हा ते एकच असे स्थान आहे की जिथे संपूर्ण अहिंसा वर्तत असते! आणि तिथे तर तीर्थंकर आणि ज्ञानींचीच वर्तना!!! हिंसेच्या सागरात संपूर्ण अहिंसकपणे वर्ततात अशा ज्ञानी पुरुषांकडून प्रकाशमान झालेले हिंसेसंबंधीचे, स्थूल हिंसे-अहिंसेपासून ते थेट सूक्ष्मतम हिंसे-अहिंसेपर्यंतचे अचूक दर्शन येथे संकलित केले गेले आहे आणि ते या अंतर आशयाने प्रकाशित करण्यात आले आहे, की जेणेकरून घोर हिंसेत अडकलेल्या या काळातील मानवाची दृष्टी थोडीफार तरी बदलेल आणि या भव-परभवाचे श्रेय त्यांच्या मार्फत साधले जाईल.

बाकी तर, द्रव्य हिंसेपासून कोण वाचू शकेल? तीर्थंकरांनी सुद्धा निर्वाण होण्यापूर्वी जो शेवटचा श्वास सोडला तेव्हा कितीतरी वायुकाय जीव मेले होते! त्यांना जर अशा हिंसेचा दोष लागला असता तर त्यांना त्या पापासाठी पुन्हा कोणाच्या तरी घरी जन्म घ्यावाच लागला असता. मग मोक्ष शक्य झाला असता का? तर मग त्यांच्याकडे अशी कोणती प्राप्ती असेल की ज्याच्या आधारावर ते सर्व पुण्य-पापांपासून आणि

क्रियांपासून मुक्त राहू शकले आणि मोक्षाला गेले? असे सर्व रहस्य प्रकट ज्ञानी की ज्यांच्या हृदयात तीर्थंकरांच्या हृदयातील ज्ञान जसे आहे तसे प्रकाशित झाले असेल, तेच करू शकतात आणि ते येथे जसे आहे तसे प्रकाशित होत आहे. या काळातील ज्ञानी परम पूज्य दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेली वाणी अहिंसेच्या ग्रंथाद्वारे संकलित झाली आहे, जी मोक्षमार्गाच्या चाहत्यांना अहिंसेसाठी अत्यंत सरळ मार्गदर्शकाच्या स्वरूपात उपयोगी सिद्ध होईल.

**–डॉ नीरूबहन अमीन**

# अनुक्रमणिका

# अहिंसा

## प्रयाण, 'अहिंसा परमोधर्म' प्रती

**प्रश्नकर्ता :** 'अहिंसेच्या मार्गावर धार्मिक, आध्यात्मिक प्रगती', याविषयी कृपया समजवा.

**दादाश्री :** अहिंसा हाच धर्म आहे आणि अहिंसा हीच अध्यात्माची उन्नती आहे. परंतु अहिंसा म्हणजे मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख होऊ नये याकडे लक्ष असले पाहिजे, आपल्या श्रद्धेत असले पाहिजे, तेव्हा ते शक्य होते.

**प्रश्नकर्ता :** 'अहिंसा परमोधर्म' हा मंत्र जीवनात कशा प्रकारे उपयोगी पडतो?

**दादाश्री :** सकाळी घराबाहेर निघताना 'प्राप्त मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख न होवो' अशी भावना पाच वेळा केल्यानंतरच घराबाहेर निघावे. मग जर कोणाला दु:ख झाले असेल, तर ते लक्षात ठेवून त्याचा पश्चात्ताप करावा.

**प्रश्नकर्ता :** आपल्याकडून कोणालाही दु:ख होणार नाही, असे जीवन आपण या काळात कसे जगू शकतो?

**दादाश्री :** तुम्हाला तशी भावनाच करायची आहे आणि त्यासाठी दक्षता घ्यायची आहे. आणि तरी देखील दु:ख झालेच तर त्याचा पश्चात्ताप करायचा आहे.

**प्रश्नकर्ता :** आपल्याशी जुळलेल्या, आजुबाजूच्या कुठल्याही जीवाला दु:ख होणार नाही असे जीवन जगणे शक्य आहे का? आपल्या आजुबाजूला असलेल्या प्रत्येक जीवाला प्रत्येक परिस्थितीत आपण संतोष देऊ शकतो का?

**दादाश्री :** ज्याची अशी (संतोष) देण्याची इच्छा असेल तो नक्कीच करू शकतो. जरी एका जन्मात सिद्ध झाले नाही तरी दोन-तीन जन्मात ते सिद्ध होईलच! तुमचे ध्येय मात्र निश्चित असायला पाहिजे, लक्ष्य असले पाहिजे, मग ध्येय सिद्ध झाल्याशिवाय राहणारच नाही.

## टळते हिंसा, अहिंसेने...

**प्रश्नकर्ता :** हिंसा टाळण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** निरंतर अहिंसकभाव उत्पन्न केला पाहिजे. मला लोक विचारतात, 'हिंसा आणि अहिंसा कुठपर्यंत पाळावी?' मी सांगितले, 'हिंसा आणि अहिंसेची भेदरेषा महावीर भगवंत आखूनच गेले आहेत.' त्यांना माहीत होते की पुढे दूषमकाळ येणार आहे. भगवंतांना काय हे माहीत नव्हते की हिंसा कोणाला म्हणतात आणि कोणाला नाही? महावीर भगवंत काय सांगतात की हिंसेच्या समोर अहिंसा ठेवा. समोरच्या व्यक्तीने हिंसेचे हत्यार वापरले तर आपण अहिंसेचे हत्यार वापरावे, तरच सुख उत्पन्न होईल. हिंसेने हिंसा कधीच बंद होणार नाही, अहिंसेनेच हिंसा बंद होईल.

## समज, अहिंसेची

**प्रश्नकर्ता :** अधिक तर लोक हिंसेच्या मार्गानेच जात आहेत, त्यांना अहिंसेच्या मार्गावर वळवण्यासाठी काय करावे?

**दादाश्री :** आपण त्यांना समजावले पाहिजे. समजावले तर ते अहिंसेच्या दिशेकडे वळतील. त्यांना सांगावे, 'भाऊ प्रत्येक जीवमात्रात भगवंत विराजमान आहेत. तुम्ही जर त्या जीवांना माराल तर त्यांना

खूप दु:ख होईल, तुम्हाला त्याचा दोष लागेल आणि तुमच्यावर (ज्ञानावर) आवरणे येतील, शिवाय तुम्हाला भयंकर अधोगतीतही जावे लागेल.' अशा प्रकारे नीट समजावल्याने ते अहिंसेकडे वळतील. जीवहिंसेमुळे तर बुद्धीसुद्धा बिघडते. तुम्ही असे समजावता का कोणाला?

**प्रश्नकर्ता :** अहिंसा पाळण्याची आपली भावना ठाम असेल, परंतु काही व्यक्ती ती अजिबात मानत नसतील तर काय करावे?

**दादाश्री :** आपली ठामपणे अहिंसा पाळण्याची भावना असेल तर आपण नक्कीच अहिंसा पाळावी. तरी पण काही व्यक्ती अहिंसेला मानत नसतील तर त्यांना हळूवारपणे समजवावे. हळूहळू त्यांची समजूत घालावी, म्हणजे मग तेही मानू लागतील. आपला प्रयत्न असेल तर कधी ना कधी हे शक्य होईल.

**प्रश्नकर्ता :** हिंसा थांबविण्याच्या प्रयत्नात निमित्त बनण्यासाठी आपण यापूर्वी समजावले होते. जे अहिंसा पाळणे मानत नसतील त्यांना प्रेमाने समजावून सांगावे. परंतु प्रेमाने समजावल्यानंतरही ते ऐकत नसतील तर काय करावे? हिंसा चालू द्यायची की शक्ती वापरून त्यास थांबविण्याचा प्रयत्न करणे योग्य मानले जाईल?

**दादाश्री :** तुम्ही ज्या देवाला मानत असाल त्यांची अशा प्रकारे भक्ती करावी, की 'हे देवा, प्रत्येकाला हिंसा रहित बनवा.' अशी तुम्ही भावना करा.

## ढेकूण, एक समस्या (?)

**प्रश्नकर्ता :** घरात खूप ढेकूण झाले असतील तर काय करावे?

**दादाश्री :** एकदा आमच्या घरातसुद्धा खूप ढेकूण झाले होते! बऱ्याच वर्षांपूर्वीची ही गोष्ट आहे. तर ते ढेकूण इथे गळ्याला चावायचे, तेव्हा मी त्यांना उचलून माझ्या पायावर ठेवायचो. कारण गळ्यावर

चावलेलेच मात्र सहन होत नव्हते. म्हणून गळ्याला चावले की त्यांना मी पायावर ठेवायचो. कारण आपल्या हॉटेलात कोणी आले आणि ते उपाशी राहिले तर ते चुकीचे म्हटले जाईल ना?! तो आपल्याकडे येऊन जेवून गेला तर चांगलेच म्हणायचे ना! पण तुमच्यात एवढी शक्ती येणार नाही. म्हणून मी तुम्हाला तसे करण्यास सांगत नाही. तुम्ही तर त्या ढेकणाला उचलून बाहेर ठेवून या. म्हणजे तुम्हाला समाधान वाटेल की हा ढेकूण बाहेर गेला.

आता नियम असा आहे की, तुम्ही जरी लाख ढेकूण बाहेर नेऊन सोडले तरी पण आज रात्री तुम्हाला सात ढेकूण चावणार असतील तर ते सात चावल्याशिवाय राहणारच नाहीत. तुम्ही मारून टाकले तरीही सात चावतील, घराच्या बाहेर फेकून आलात तरीही सात चावतील, दूर फेकून आलात तरीही सात चावतील आणि काहीही केले नाही तरीसुद्धा सातच चावतील.

हे ढेकूण काय म्हणतात? 'तू जर खानदानी असशील तर आम्हाला आमचा आहार घेऊ दे आणि तू जर खानदानी नसशील तरी पण आम्ही जेवूनच जाणार आहोत, पण जेव्हा तू झोपशील तेव्हा. त्यापेक्षा तू आधीच खानदानीपणा दाखव ना!' म्हणून मी तर माझा खानदानीपणा दाखवला होता. पूर्ण शरीराला चावत असतील तरी चावू द्यायचो. ते ढेकूण माझ्या हाताने पकडलेही जायचे. पण मी त्यांना उचलून पुन्हा पायावर ठेवायचो. नाही तरी आपण झोपल्यावर ते पोटभर जेवण जेवूनच जातात ना! आणि ते ढेकूण सोबत काही भांडे वगैरे तर घेऊन येत नाहीत. स्वतःपुरते खाऊन निघून जातात. आणि पुन्हा असेही नाही की दहा-पंधरा दिवसांचे एकदम खाऊन घ्यायचे! तर मग त्याला उपाशी कसे जाऊ द्यायचे? हो, बरेच ढेकूण जेवून जायचे, निवांतपणे! मग रात्री आम्हाला आनंद वाटायचा की एवढे सारे जेवून गेले, दोन माणसांना जेवू घालण्याची शक्ती नाही आणि हे तर एवढ्या सर्वांना जेवू घातले!

## ढेकूण मारणारे, तुम्ही ढेकूण मेकर आहात का?

**प्रश्नकर्ता :** पण घरात ढेकूण-मच्छर-झुरळ त्रास देत असतील तर आपण त्यावर काही उपाय केले पाहिजेत का?

**दादाश्री :** घरात ढेकूण-मच्छर-झुरळ होऊ नये यासाठी आपण साफसफाई करून घर स्वच्छ ठेवले पाहिजे. आणि जी झुरळे झाली असतील त्यांना पकडून बाहेर कुठे तरी, खूप दूर, गावाच्या बाहेर दूर जाऊन टाकून यावे. परंतु त्यांना मारायला तर नकोच.

एक खूप मोठा कलेक्टर सारखा माणूस होता. त्याने मला त्याच्या घरी बोलावले होते. मला म्हणाला, 'ढेकूण तर मारूनच टाकले पाहिजेत.' मी म्हणालो, 'असे कुठे लिहिले आहे?' तेव्हा तो म्हणाला, 'पण ते आपल्याला चावतात ना, आणि आपले रक्त पितात.' त्यावर मी म्हणालो, 'तुम्हाला मारण्याचा अधिकार किती आहे हे मी तुम्हाला नियमानुसार समजावतो. मग तुम्ही मारा किंवा नका मारू, त्याबद्दल मी काही सांगत नाही. या जगातील कुठल्याही मनुष्याने स्वतः एक जरी ढेकूण बनवून दिला तर मग मारा. जे तुम्ही 'क्रिएट' (निर्माण) करू शकता त्याचा तुम्ही नाश करू शकता. जे तुम्ही क्रिएट करत नाहीत, त्याचा तुम्ही नाश करू शकत नाही.'

म्हणजे जो जीव तुम्ही बनवू शकता, त्याला मारण्याचा अधिकार आहे. जे तुम्ही बनवू शकत नाही, 'क्रिएट' करू शकत नाही त्याला मारण्याचा तुम्हाला अधिकार नाही. ही खुर्ची तुम्ही बनवू शकता म्हणून तिला तोडू शकता, कप-बशी बनवू शकता म्हणून तिला तोडू शकता, पण जे तुम्ही बनवू शकत नाही, त्याला मारण्याचा अधिकार तुम्हाला नाही.

**प्रश्नकर्ता :** मग ते चावायला का येतात?

**दादाश्री :** त्यांचाशी तुमचा हिशोब आहे म्हणून येतात. आणि हा देह काही तुमचा नाही, तुमच्या मालकीचा नाही. हा सगळा माल

तुम्ही चोरून आणला आहे, म्हणून ढेकूण त्यातलाच तुमच्याकडून चोरून नेतात. हे सर्व हिशोब चुकते होत आहेत. तेव्हा आता त्यांना मारू नका.

## भगवंताच्या बागेला लुटू नये

असे आहे, समजा इथे एखादी बाग असेल व त्या बागेभोवती कुंपण असेल. आणि त्या कुंपणाच्या बाहेर तुरई, दुधी वगैरे लोंबकळत असतील, त्याच्या मूळ मालकाच्या जागेबाहेर लोंबकळत असतील तरीही लोक काय म्हणतील? 'अरे, ही तर त्या सुलेमानची बाग आहे, तोडू नकोस. नाही तर तो मियाँभाई मारून-मारून तेल काढेल.' आणि जर कोणा आपल्या लोकांची बाग असेल तर लोक तोडून नेतात. कारण त्यांना माहीत आहे की ही बाग अहिंसक भाववाल्याची आहे. तो आपल्याला काही करणार नाही. लेट गो करेल. आणि सुलेमान तर चांगलाच चोप देईल. म्हणजे जर सुलेमानच्या बागेतून एकसुद्धा तुरई किंवा दुधी घेऊ शकत नाही, तर मग या भगवंताच्या बागेतील ढेकूण कशाला मारता? भगवंताच्या बागेला तुम्ही का लुटता? समजले का तुम्हाला? म्हणून एकाही जीवाला मारू नये.

## प्राप्त तप करा

**प्रश्नकर्ता :** पण ढेकूण चावतात त्याचे काय?

**दादाश्री:** त्याचा आहारच रक्त आहे. त्याला आपण खिचडी दिली तर काय तो खाणार? भरपूर तूप घालून खिचडी दिली तरी तो खाणार का? नाही. कारण त्याचा आहारच 'रक्त' आहे.

**प्रश्नकर्ता :** पण त्याला चावू देणे हे तर योग्य नाहीच ना?

**दादाश्री :** पण उपास करता तेव्हा आत जी आग होते ती चालवून घ्यायची? मग हे तप करा ना! हे तप तर प्रत्यक्ष मोक्षाचे कारण आहे. स्वत:हून उभे केलेले तप कशाला करता? समोर येऊन

ठेपलेले तप करा ना! समोर आलेले तप हे प्रत्यक्ष मोक्षाचे कारण आहे आणि तुम्ही स्वत:हून उभे केलेले तप हे संसाराचे कारण आहे.

**प्रश्नकर्ता :** हो, खूपच मजेदार गोष्ट सांगितली. आम्ही ओढवून घेतलेले तप करत असतो, त्यापेक्षा तर हे जे येऊन ठेपलेले तप आहे ते होऊ द्यायचे.

**दादाश्री :** हो, ते तप तर ओढवून घेतलेले असते आणि हे तर प्राप्त तप आहे, समोरून सहजपणे आलेले! आपण काही सर्व ढेकणांना बोलवायला जात नाही. जेवढे ढेकूण आले असतील तेवढ्यांनी आरामशीर जेवावे, 'तुमचेच घर आहे.' मग त्यांना खाऊ घालूनच पाठवावे.

## मातेने संस्कार दिले अहिंसा धर्माचे

माझी आई माझ्यापेक्षा छत्तीस वर्षांनी मोठी होती. मी तिला विचारले की, 'घरात ढेकूण झाले आहेत ते तुला चावत नाहीत का?' तेव्हा आई म्हणाली, ''बेटा, चावतात तर खरे. पण ते इतरांसारखे टिफिन थोडेच घेऊन येतात, की 'आम्हाला, द्या माय-बाप?' ते बिचारे सोबत भांडे घेऊन येत नाहीत आणि त्यांचे खाऊन झाल्यावर निघूनही जातात!'' मी म्हणालो, धन्य आहे अशा मातेची! आणि या मुलाचीही धन्य आहे!

मी जर कोणाला दगड मारून आलो असेल ना, तर आई मला काय म्हणायची? 'अरे, त्याचे रक्त निघेल. त्या बिचाऱ्याची आई नाही, मग कोण औषध-पाणी करेल? आणि तुझ्यासाठी तर मी आहे. तू मार खाऊन येत जा, मी तुझी मलमपट्टी करेन. तू स्वत: मार खाऊन ये पण (दुसऱ्यांना) मारून येऊ नकोस.' बोला आता, अशी आई आपल्या मुलाला महावीर बनवणार की नाही?

**प्रश्नकर्ता :** सध्या तर याहून उलटच चालले आहे. आज तर म्हणतील, बघ हं, मार खाऊन आलास तर!

**दादाश्री :** आजच नाही, हे पूर्वीपासूनच उलटे आहे, आत्ताच्या काळामुळे काही बदल झालेला नाही. पूर्वीपासूनच असे उलटे होते. जग हे असेच आहे! यामधून ज्याला महावीरांचा शिष्य व्हायचे असेल तो होऊ शकतो, नाही तरी शेवटी लोकांचे शिष्य तर व्हावेच लागणार. ते आपले गुरु, आपले बॉस आणि आपण त्यांचे शिष्य. मग मार खातच राहायचे ना! त्यापेक्षा तर महावीर भगवंत आपले बॉस झालेले चांगले, कारण ते वीतराग तरी आहेत. भांडण वगैरे तर करत नाहीत.

## स्वच्छता ठेवा, औषध मारू नका

कित्येक जण ढेकणांना मारत नाहीत, पण गोधड्या वगैरे उन्हात वाळत टाकतात. आमच्या घरात तर याचीसुद्धा मी मनाई केली होती. मी म्हणालो, 'कशाला त्या बिचाऱ्या ढेकणांना उन्हात त्रास देता?' तेव्हा ते म्हणतात, 'मग त्यांचा अंत केव्हा येईल?' मी सांगितले, 'ढेकणांना मारल्याने त्यांच्या संख्येत घट होत नाही. हा एक गैरसमज आहे की ढेकूण मारल्याने ढेकूण कमी होतात. मारल्याने कमी होत नाहीत. कमी झाले असे वाटते, पण दुसऱ्या दिवशी परत तेवढेच्या तेवढेच असतात.'

म्हणून आपण नीट साफसफाई केली पाहिजे. स्वच्छता असल्यावर ढेकूण उत्पन्न होत नाहीत. पण त्यांच्यावर औषध फवारले तर तो गुन्हाच म्हटला जाईल ना! आणि औषधाने ते काही मरत नाहीत. मरून गेले असे वाटते पण पुन्हा दुसऱ्या ठिकाणी त्यांची उत्पत्ती होतेच. ढेकणांचाही एक नियम असतो. मी हे शोधून काढले होते की काही काळानंतर एकही ढेकूण दिसत नाही. कारण ते ठराविक काळानुसारच असतात आणि जेव्हा त्यांचा सीझन येतो तेव्हा ते पुष्कळ प्रमाणात वाढतात. मग तुम्ही कितीही औषध फवारले तरी पण ते वाढतच जातात.

## संपवा पेमेंट पटापट

**प्रश्नकर्ता :** ढेकूण त्याचा हिशोब असेल तेवढेच घेतो ना?

**दादाश्री :** आम्ही तर आधीच पेमेंट चुकते करून टाकले होते, म्हणून सध्या जास्त भेटत नाहीत. परंतु आत्तासुद्धा जर कधी ढेकूण आमच्याजवळ आलेच तर ते आम्हाला ओळखून घेतात की हे काही मारणार नाहीत, त्रास देणार नाहीत. आम्हाला ओळखतात. अंधारातही ते आमच्या हातात येतात. पण ते जाणतात की हे आम्हाला सोडून देतील. आम्हाला ओळखतात. इतर सर्व जीवांनाही ते ओळखतात की हे निर्दयी आहेत, हे असे आहेत. कारण त्यांच्यातही आत्मा आहे. मग का नाही ओळखणार?!

आणि हा हिशोब चुकता केल्याशिवाय तर सुटकाच नाही. ज्यांचे-ज्यांचे रक्त प्यायला असाल त्यांना रक्त पाजावे लागेल. म्हणजे ती ब्लड बँक असते ना? तशी ही ढेकूण बँक म्हटली जाते. कोणी दोन घेऊन आला असेल तर दोन घेऊन जातो. तर ही बँक म्हटली जाते, बँकेत सर्व जमा होत असते.

## ते रक्त पितात की देहभाव सोडवतात?

म्हणजे जर ढेकूण चावत असेल तर त्याला उपाशी जाऊ देऊ नये. आपल्यासारख्या इतक्या श्रीमंत माणसाकडून तो गरीब ढेकूण बिचारा उपाशी जाईल हे कसे परवडेल?

आणि मला असे म्हणायचे आहे की, ते जर आपल्याला सहन होत नसेल तर त्यांना बाहेर नेऊन सोडावे. खरं तर आपली क्षमता असायला हवी. त्यांना जेवू घालण्याची शक्ती असायला हवी आणि ती शक्ती नसेल तर आपण त्यांना बाहेर नेऊन सोडावे. म्हणावे भाऊ, तुम्ही दुसऱ्या जागी जेवायला जा. आणि जेवू घालण्याची शक्ती असेल तर त्याला जेवण करवूनच पाठवावे. तो जर जेवून गेला तर तुमचा खूप मोठा फायदा करून देईल. आत्मा मुक्त करून देईल. देहात थोडा भाव राहिला असेल तो देहभाव सुटेल. आणि हे ढेकूण काय म्हणतात? 'तुम्ही का म्हणून झोपता? तुमचे (आत्म्याचे) काही काम करून घ्या ना!' म्हणजे ते तर पहारेकरी आहेत.

## ते नाही नियमाबाहेरचे

**प्रश्नकर्ता :** आणि हे डाससुद्धा खूप त्रास देतात?

**दादाश्री :** असे आहे, या जगात जर कोणतीही वस्तू त्रास देत असेल ना, ती नियमाबाहेर त्रास देऊच शकत नाही. म्हणजे ते नियमाबाहेर नाही. तुम्हाला नियमानुसारच त्रास होत आहे. आता तुम्हाला त्यापासून बचाव करायचा असेल तर मच्छरदाणी बांधा. किंवा असे अन्य काही उपाय करा, पण त्यांना मारणे हा गुन्हा आहे.

**प्रश्नकर्ता :** बचाव करावा, पण मारू नये.

**दादाश्री :** हो, बचाव करावा.

**प्रश्नकर्ता :** पण डासाला मारले आणि 'श्रीराम' म्हटले तर तो उच्च गतीत जातो का?

**दादाश्री :** पण तो आपली अधोगती करेल. कारण त्याला त्रास होत असतो.

**प्रश्नकर्ता :** संतांना डास चावतात की नाही?

**दादाश्री :** भगवंतालासुद्धा चावले होते ना! महावीर भगवंताना तर खूप चावले होते. हिशोब चुकता केल्याशिवाय सोडतच नाहीत ना!

## सर्व आपलेच हिशोब

म्हणजे एखाद्या डासाचा स्पर्श होणे ही काही थाप नाही. तर मग दुसरी कुठली गोष्ट थाप म्हणायची?! अरे, इथे पायाला चावायचे असेल तरी चावू शकत नाही, इथे हातावरच चावेल तेव्हाच जमेल. नेमके त्याच जागेवर! इतके हे जग आयोजनपूर्वकचे आहे. हे जग म्हणजे काय थाप आहे का? एकदम 'रेग्युलेटर ऑफ द वर्ल्ड' आहे आणि वर्ल्डला सदैव 'रेग्युलेशन' मध्येच ठेवते, आणि हे सर्व मी स्वतः पाहून सांगत आहे.

# करू नये कुठेही, हिटलरिजम

या जगात कोणीही तुमच्यात ढवळाढवळ करू शकेल अशा परिस्थितीत नाही. म्हणून जगाचा दोष काढू नका, तुमचाच दोष आहे. तुम्ही जेवढी ढवळाढवळ केली आहे त्याचाच हा परिणाम आहे. तुम्ही ढवळाढवळ केली नसेल तर त्याचा परिणाम तुमच्यावर होणार नाही.

एक डाससुद्धा तुम्हाला स्पर्श करू शकत नाही, जर तुम्ही ढवळाढवळ केली नाही तर. समजा खूप ढेकूण असलेल्या अंथरुणात तुम्हाला झोपवले पण तुम्ही दखल केलेली नसेल तर एकसुद्धा ढेकूण तुम्हाला स्पर्श करणार नाही. त्यामागे कोणता नियम असेल? ढेकणांसाठी लोक विचार करतात ना, की 'अरे, त्यांना उचलून फेका, असे करा, तसे करा' अशी दखल करतात ना सगळे जण? आणि औषध फवारतात ना? हिटलरिजम सारखे करतात? असे करतात ना? तरी पण ढेकूण काय म्हणतात, 'आमचा वंश नाश पावणार नाही. आमचा वंश तर वाढतच जाणार.'

अर्थात जर तुमची ढवळाढवळ बंद झाली तर सारे काही स्वच्छ होऊन जाईल. तुमची दखल नसेल तर या जगात तुम्हाला कोणीही चावू शकणार नाही. नाही तर ही ढवळाढवळ कुणालाही सोडत नाही.

नेहमी, हिशोब चुकता झाला असे केव्हा म्हटले जाईल? तर डासांच्या मधोमध बसला असाल तरीही डास स्पर्श करत नाहीत, तेव्हा खऱ्या अर्थाने हिशोब चुकता झाला असे म्हटले जाईल. डास स्वतःचा स्वभाव विसरतो. ढेकूण स्वतःचा स्वभाव विसरतो. इथे जर कोणी मारण्यासाठी आला असेल ना, तरी मला पाहताच तो मारण्याचे विसरून जातो. त्याचे सर्व विचारच बदलून जातात, त्याच्यावर परिणाम होतो, अहिंसेचा इतका सारा इफेक्ट होतो.

डासाला माहीत नाही की, मी चंदुभाऊकडे जात आहे आणि

या चंदुभाऊला सुद्धा माहीत नाही की हा डास माझ्याकडे येत आहे. ही 'व्यवस्थित शक्ती' संयोग, काळ वगैरे सर्व असे जुळवून आणते की दोघांना एकत्र करून एकमेकांचे भाव चुकते करवून देते. आणि नंतर दोघेही मोकळे होतात. इतके सारे 'व्यवस्थित' आहे! म्हणजे डासाला हवेत ओढत-ओढत इथे आणतो आणि डंख मारून तो डास पुन्हा हवेत ओढला जातो. नंतर तो कितीतरी मैल दूर निघून गेलेला असतो! मग तिथे जो वाकडा असेल त्याला फळ देतो.

## काही फरक नाही, काटा आणि डासामध्ये

हा डास चावतो तेव्हा लोकांना डासाचा दोष दिसतो आणि जेव्हा काटा टोचतो तेव्हा काय करता? एवढा मोठा काटा पायात रुततो तेव्हा? काटा आणि डास यात अजिबात फरक नाही, भगवंताने यात फरक मानलेला नाही. जो चावतो ना, तो आत्मा नाही. ते सर्व काटेच आहेत. पण त्या काट्याचा दोष दिसत नाही ना! त्याचे काय कारण?

**प्रश्नकर्ता :** तेथे कोणी जिवंत निमित्त दिसत नाही!

**दादाश्री :** आणि तो डास तर जिवंत दिसतो ना, म्हणून त्याला वाटते की हाच मला चावला. 'स्वत:ला' भ्रांति असल्यामुळे त्याला जगसुद्धा भ्रांतिमयच दिसते. आत्मा कोणाला चावतच नाही. हे सर्व अनात्मा होऊन जगाला शिक्षा देत आहेत. परमात्मा शिक्षा देत नाहीत, आत्माही शिक्षा देत नाही, हे तर बाभळीचे काटेच सर्वांना टोचत राहतात.

डोंगरावरून भला मोठा दगड डोक्यावर पडला तर आधी वर मान करून बघतो की कोणी वरून घरंगळवला तर नाही ना? तिथे कोणी दिसले नाही की चूप! आणि जर एखाद्याने छोटासा खडा जरी मारला तरी त्याच्याशी हळदीघाटाचे युद्ध सुरू करतो. याचे कारण काय? तर भ्रांतदृष्टी.

हे 'अक्रम विज्ञान' काय सांगते? की तो काटाही निमित्त आहे आणि हा भाऊसुद्धा निमित्त आहे. दोष तर तुमचाच आहे. या फुलाला

तुडवले तर त्याचे फळ येत नाही आणि काट्याला तुडवले तर फळ येते, तसेच या मनुष्यातही आहे. म्हणून जपून चाला. काटा टोचणे किंवा विंचवाचे चावणे दोन्हीही कर्मफळे आहेत. हे फळ आले, पण कोणाचे फळ? माझे स्वत:चे. मग यात 'त्यांचे काय घेणेदेणे?' ते तर बिचारे निमित्त आहेत. जेवू घालणारे कोण असतात आणि वाढणारे कोण असतात?

म्हणून सावध व्हा. हे जग खूप वेगळ्या प्रकारचे आहे. अगदीच न्याय स्वरूप आहे. मी संपूर्ण जीवनाचा हिशोब (सार) काढला आहे, तो हिशोब काढता-काढता असा छान हिशोब काढला आहे, आणि एक दिवस तो हिशोब मी जगाला देईन तेव्हाच जगाला शांती वाटेल. त्याशिवाय शांती वाटणार नाही. अनुभव तर घ्यावाच लागेल ना! अनुभवाच्या कक्षेपर्यंत आणले तरच काम होईल! 'याचा काय परिणाम येईल' असे रिसर्च (संशोधन) तर करावे लागते ना!

## जगण्याचा अधिकार तोडू शकतो का कोणाचा?

मी याचासुद्धा तपास केला होता. काय पण या अक्कलवाल्यांनी अब्रू मिळवली! उंदीर हे मांजरीचे भोजन आहे. खाऊ द्या ना तिला! आणि जर चिचुंद्री जात असेल ना, तर मांजर तिला शिवतसुद्धा नाही. मांजर जर उपाशीच असेल तर उंदीराला, जीवजंतूंना खाऊन टाकते मग त्या चिचुंद्रीला का खात नाही? पण ती चिचुंद्रीला शिवतही नाही. यावर तुम्ही विचार करा.

काही पुण्य केले होते म्हणून बसल्या-बसल्या, आरामशीर खायला मिळते. आणि या मजुरांना तर कष्ट केल्यानंतर पैसे मिळतील तेव्हा खायला मिळते. म्हणून आपण आता आपल्याकडून कोणाला दु:ख होणार नाही, प्राण्यांना, छोट्या जीवजंतूनाही दु:ख होणार नाही असे वर्तन असावे. तसे तर लोक देवाचे नाव घेत राहतात आणि ज्यात देव बसले आहेत त्यांना मारत राहतात. साप निघाले तर त्यांना मारून टाकतात, ढेकणालाही मारून टाकतात. असे शूरवीर (!) लोक!

लोक असे मारतात का? मोठे शूरवीरच म्हणायचे ना! म्हणजे लोक मारण्यात मात्र शूर! आणि हे कोणाचे सर्जन आहे की तुम्ही विसर्जन करायला तयार होतात?! तुम्ही ज्याचे सर्जन करू शकता त्याचेच विसर्जन करू शकता. काही न्याय असेल की नाही?

असे आहे, हा तर रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंटने ढेकूण आहे आणि रियल व्ह्यू पॉइंटने शुद्धात्मा आहे. तुम्हाला शुद्धात्म्याला मारायचे आहे का? जमत नसेल तर बाहेर जाऊन टाकून या ना! म्हणजे मनुष्य सगळ्यांना मारून सुख शोधत असतो. डासांना मारायचे, ढेकूण मारायचे, जे आले त्यांना मारायचे आणि सुख शोधायचे, ह्या दोन्ही गोष्टी एकाच वेळी होणे कसे शक्य आहे?

**प्रश्नकर्ता :** घरात खूप मुंग्या झाल्या तर काय करावे?

**दादाश्री :** ज्या खोलीत मुंग्या झाल्या असतील ती खोली बंद ठेवावी. याला उपद्रव म्हणतात. निसर्गाचा नियम असा आहे की काही दिवसांपर्यंत असा उपद्रव चालू राहतो. मग त्याची वेळ संपल्यावर उपद्रव बंद होऊन जातो, आपोआपच, नैसर्गिकपणेच बंद होतो! म्हणून आपण ती खोली बंद ठेवावी. याचा जर तुम्ही शोध घेतला तर तुमच्याही लक्षात येईल. हा उपद्रव पर्मनन्ट आहे की टेम्परारी?

**प्रश्नकर्ता :** जास्त करून मुंग्या स्वयंपाक घरातच येत असतात. मग स्वयंपाक घर कसे बंद ठेवू शकतो?

**दादाश्री :** हे तर सर्व विकल्प आहेत. आपण हे समजून घ्यायला हवे. उपद्रव असेल तिथून बाजूला व्हावे. दोन स्वयंपाक घरे ठेवा. एक स्टोव वेगळा ठेवा. मग त्या दिवशी काही तरी उकळून खाऊन घ्यावे. मारणे ही खूप भयंकर जोखीम आहे.

**प्रश्नकर्ता :** दररोजच्या व्यवहारात ज्यांच्यामुळे त्रास होतो त्यांनाच मारतो. दुसऱ्या कोणाला तर मारत नाही.

**दादाश्री :** ज्याला जीवजंतू मारायचे आहेत त्याला तसेच संयोग

जुळून येतात आणि ज्याला मारायचे नाहीत त्याला त्याप्रमाणे संयोग जुळून येतात.

काही दिवसांसाठी 'मारायचे नाही' असा प्रयत्न कराल तर संयोग बदलतील. जगाचे नियम जर समजू शकाल तर प्रश्न सुटेल. अन्यथा मारण्याची परंपरा सुटत नाही आणि संसाराची परंपराही तुटत नाही. चुकून जर मारले गेले तर त्याबद्दल माफी मागून प्रतिक्रमण करून घ्यावे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही सुद्धा दैनंदिन जीवनात विविध प्रकारची औषधे टाकून जीवजंतूंना मारत असतो, तर त्याचा इफेक्ट (परिणाम) आपल्यावर होतो का?

**दादाश्री :** तुम्ही जेव्हा मारता त्याचवेळी आतील परमाणू बदलतात आणि तुमच्या आत सुद्धा (जीव) मरतात. जितके तुम्ही बाहेर माराल तितके आत मरतील. जेवढे जग बाहेर आहे तेवढे जग आतही आहे. तुम्हाला जितके मारायचे असेल तितके मारा, तुमच्या आतसुद्धा मरत राहतील. जेवढे या ब्रह्मांडात आहे तेवढे या पिंडात आहे.

इतके सारे चोर असतात की, आपण त्यातून वाचू शकतच नाही. आपण कधी कोणाचा खिसा कापण्याचा, चोरी करण्याचा विचार करत नाही म्हणून ते आपला खिसा कापत नाहीत. अर्थात तुम्ही हिंसक न होता अहिंसक व्हाल, तर तुम्हाला हिंसेचे संयोगच उत्पन्न होणार नाहीत, असे हे जग आहे. जगास जर एकदा समजून घेतले तर उलगडा होईल.

## सहमत होतात त्यांचा गुन्हा

**प्रश्नकर्ता :** पावसाळ्यात गावांमध्ये माश्या व डास अधिक प्रमाणात असतात, तेव्हा म्युनिसिपालिटीवाले किंवा आपल्या घरचे सर्व 'फ्लीट' (फवारा) मारतात, तर तेसुद्धा पापच म्हटले जाईल ना? आणि जर तसे नाही केले तर भयंकर रोगराई पसरते.

**दादाश्री :** असे आहे ना, त्या सरमुख्यताराने बॉम्बगोळा फेकला त्याच्यात आणि तुझ्यात काय फरक राहिला? तू तर त्यांच्यातलाच छोटा सरमुख्यतार झालास!

**प्रश्नकर्ता :** पण ही तर गावची गोष्ट झाली ना! पावसाळ्यात तर सगळीकडे घाण असतेच. त्यामुळे सगळीकडेच मच्छर, माश्या वगैरे होतात. म्हणून म्युनिसिपालिटीवाले काय करतात की सगळीकडे औषध फवारतात.

**दादाश्री :** म्युनिसिपालिटीवाले करतात, त्यात आपल्याला काय घेणेदेणे? आपल्या मनात मात्र असे भाव असता कामा नयेत. आपल्या मनात तर असेच असायला हवे की असे नसेल तर बरे.

**प्रश्नकर्ता :** तर मग म्युनिसिपालिटीची कामे करणारी जी माणसे आहेत, जी सत्तेवर असतात, त्यांना दोष लागतो का?

**दादाश्री :** नाही, त्यांनाही दोष लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** मग कोणाला दोष लागतो?

**दादाश्री :** ते तर फक्त करणारेच आहेत. त्यांच्याकडून हे काम कोण करवून घेतात? तर त्यांचा वरिष्ठ अधिकारी वर्ग.

**प्रश्नकर्ता :** मग वरिष्ठ अधिकारी कोणासाठी करतात?

**दादाश्री :** त्यांचे कर्तव्य म्हणून करतात! स्वत:साठी करत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** पण आपण तर तक्रार केली, पत्र लिहून नोटिस दिली.

**दादाश्री :** पण ज्यांना नाकारायचे असेल ते नाकारू शकतात. ज्यांना करायचे नसेल ते म्हणतील की, 'भाऊ, मला हे नको. मला हे आवडत नाही.' मग काय? मग स्वत:ची जबाबदारी नाही. पण ज्यांना आवडते त्यांची जबाबदारी.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे प्रत्येकाच्या भावनेवर अवलंबून आहे?

**दादाश्री :** हो, ज्याची जशी भावना असेल त्यानुसार त्याची जोखीमदारी!

**प्रश्नकर्ता :** समजा पाण्याची टाकी आहे, त्यात उंदीर मेला असेल किंवा कबूतर मेले असेल, तर त्या टाकीची साफसफाई करावी लागते, साफसफाई केल्यानंतर त्यात औषध वगैरे टाकावे लागते किंवा म्युनिसिपालिटीवाल्यांना बोलवून औषध मारून घेतो. ज्यामुळे त्या सर्व जीवजंतूंचा नाश होतो ना? तर ते पापच झाले ना? मग त्या पापाचे बंधन कोणाला लागते? करणाऱ्याला की करविणाऱ्याला?

**दादाश्री :** करणारा आणि करविणारा दोघांच्याही वाट्याला येते. पण तसा आपला भाव नसावा. आपला असा अभिप्रायही नसावा.

**प्रश्नकर्ता :** घाण मिटविण्याचा भाव आहे. कारण असे घाण पाणी प्यायले तर सगळ्यांना त्रास होईल, ते आजारी पडतील.

**दादाश्री :** हो, पण तो दोष तर लागेलच ना! हे तर असे आहे की जर असे दोष मोजत बसलो ना, तर या जगात निरंतर दोष होतच राहतात.

तेव्हा तुम्ही दुसऱ्यांची काळजी करू नका. तुम्ही तुमचे सांभाळा. 'सब सबकी संभालो.' (आपले आपले सांभाळा) प्रत्येक जीव जन्माला येताना आपापले मरण वगैरे सर्व सोबतच घेऊन आलेला असतो. म्हणूनच भगवंताने सांगितले की कोणी कोणाला मारू शकत नाही. पण ही गोष्ट ओपन (उघड) करू नका, नाही तर लोक याचा दुरुपयोग करतील.

घरात दहा माणसे राहत असतील आणि पाण्याची टाकी खराब झाली असेल, तेव्हा टाकी साफ करण्यास कोण जातो? ज्याच्यात अहंकार असतो तोच जातो. तो म्हणेल की, 'मी स्वच्छ करीन, हे तुमचे काम नाही.' म्हणजे अहंकारी असेल त्याला दोष लागतो.

**प्रश्नकर्ता :** परंतु तो तर करुणेच्या भावनेने करतो.

**दादाश्री :** करुणा असो की काहीही असो. आणि तो पापही बांधेल.

**प्रश्नकर्ता :** मग काय करावे? कितीही घाण पाणी असले तरी ते प्यायचे?

**दादाश्री :** यात काही चालणारच नाही. तो अहंकार केल्याशिवाय राहणारच नाही. तुम्हाला काळजी करण्याची गरज नाही, तुम्हाला स्वच्छ शुद्ध पाणीच मिळत राहणार. एखादा अहंकारी तुम्हाला ते स्वच्छ करूनच देईल. हो, या जगात प्रत्येक वस्तू आहे. अशी कुठलीही वस्तू नाही की जी मिळणार नाही. पण ती मिळण्यास फक्त तुमचे पुण्य कमी पडत आहे. जेवढा तुमचा अहंकार असेल तेवढे अंतराय (विघ्न) येतात. अहंकाराचे निर्मूलन झाले की प्रत्येक वस्तू तुमच्या घरी हजर असेल. जगातील अशी कुठलीही वस्तू नसेल की जी तुमच्या घरी नसेल! अर्थात अहंकारच अंतरायरूप आहे.

## शिक्षणात हिंसा?

**प्रश्नकर्ता :** हा कृषी विद्यालयात शिकत आहे, इथला विद्यार्थी आहे, तो म्हणतो की, आम्हाला शिकण्यासाठी फुलपाखरे पकडावी लागतात. आणि त्यांना मारावे लागते, तर त्यामुळे पाप लागते का? फुलपाखरे पकडली नाहीत तर आम्हाला परीक्षेत मार्कस् मिळत नाहीत, मग आम्ही काय करावे?

**दादाश्री :** त्यासाठी दररोज एक तास देवाला प्रार्थना करा की हे देवा, माझ्या नशिबी असे कसे आले? सर्वांनाच काय असे असते?! तुझ्या वाट्याला आले म्हणून तू देवाला प्रार्थना कर की, 'हे देवा, मी क्षमा मागतो. आता पुन्हा कधी माझ्या वाट्याला असे येणार नाही असे कर.'

**प्रश्नकर्ता :** म्हणजे, यात जे प्रेरणा देणारे शिक्षक असतात ते

प्रेरित करतात की तुम्ही या फुलपाखरांना पकडा आणि अशा प्रकारे अल्बम तयार करा, मग त्यांना काहीच पाप लागत नाही?

**दादाश्री :** त्यांच्या वाट्यासही येते. प्रेरणा देणाऱ्याच्या वाट्याला साठ टक्के आणि करणाऱ्याला चाळीस टक्के, असे विभागले जाते.

**प्रश्नकर्ता :** कुठलीही घटना घडत आहे ती 'व्यवस्थित शक्ती'च्या नियमानुसार बरोबरच आहे असे नाही का म्हटले जाणार? ते निमित्त बनले आणि त्यांना करावे लागले. तर मग त्यांच्या वाट्याला पाप का आले?

**दादाश्री :** पाप तर एवढ्यासाठीच लागते की, असे काम आपल्या वाट्याला नसावे, तरी पण आपल्या वाट्याला आले? बकरे कापण्याचे काम आपल्या वाट्यास आले तर बरे वाटेल का?

**प्रश्नकर्ता :** बरे तर वाटत नाही. पण दादा, करावेच लागेल असे असेल तर? नाइलाजास्तव करावेच लागते. त्याशिवाय गत्यंतरच नसेल तर?

**दादाश्री :** करावे लागले तर... पश्चात्तापपूर्वक करावे लागले तरच कामाचे. रोज एक तास पश्चात्ताप करावा लागेल, तू एक कीटक बनवून दे, बघू? फॉरेनचे सायंटिस्ट तरी बनवू शकतील का एक कीटक?

**प्रश्नकर्ता :** नाही, ते तर शक्यच नाही ना, दादाजी!

**दादाश्री :** आपण बनवू शकत नाही मग त्यांना मारू कसे शकतो?

या सर्व लोकांनी भगवंताला प्रार्थना केली पाहिजे की हे असे काम कुठून आले आमच्या वाट्याला... शेतीचे काम का म्हणून आले... शेतीच्या कामात तर निव्वळ हिंसाच आहे पण ती अशा प्रकारची नाही, आणि ही तर उघडपणे हिंसा आहे.

**प्रश्नकर्ता :** फुलपाखरांना मारून खूप चांगला नमुना घेऊन येतो. आणि वर खुश होतो की, मी कसे मारून आणले, किती छान

नमुना मिळवला. मी कसे छान पकडले! त्याचे जास्त मार्क मिळतात. मी कसे छान पकडले!

**दादाश्री :** खुश होतात ना! मग तिथे कर्मही तसेच बांधले जाईल, मग त्याचे फळसुद्धा येईल, जेवढे खुश झालात तेवढे दु:खही भोगावे लागेल.

## वेगळे हिशोब पापाचे

**प्रश्नकर्ता :** एका माणसाने गवत कापले, दुसऱ्या माणसाने झाड कापले, तिसऱ्या माणसाने मच्छर मारले, चौथ्या माणसाने हत्तीला मारले, पाचव्या माणसाने मनुष्याला मारले. आता या सगळ्यात जीव हत्या तर झालीच पण या पापाचे फळ वेगवेगळे येईल ना?

**दादाश्री :** हो वेगवेगळे. असे आहे की, यात गवताची काही किंमतच नाही.

**प्रश्नकर्ता :** पण त्यातही आत्मा तर आहेच ना?

**दादाश्री :** आत्मा आहे हे खरे. पण ते गवत तर बेशुद्धावस्थेत भोगत आहे ना!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे समोरच्याला किती दु:ख होते त्या आधारावर पाप आहे?

**दादाश्री :** हो, समोरचा किती दु:ख भोगत आहे, त्यानुसार आपल्याला पाप लागते.

**प्रश्नकर्ता :** बंगल्याच्या सभोवताली स्वत:चे गार्डन बनवतो.

**दादाश्री :** त्यात हरकत नाही, तितका वेळ आपला वाया जातो, म्हणून नाही म्हटले आहे. जीवांसाठी नाही म्हटलेले नाही.

**प्रश्नकर्ता :** पण आपण निमित्त बनलो असे म्हटले जाईल ना.

**दादाश्री :** निमित्ताची हरकत नाही. जग निमित्तरूपच आहे. आपण त्या एकेंद्रिय जीवांना दु:ख देत नाही. बाकी, असे सर्व तर चालतच राहणार. ज्या एकेंद्रिय जीवांची चिंता करायची नाही तिथे गोंधळ घालून दिला आहे. पण रस्त्याने जाताना विनाकारण झाडाची पाने तोडू नका, अनर्थक क्रिया करू नका. आणि दात घासण्यासाठी दातवण हवे असेल तर तुम्ही झाडाला म्हणावे की, 'मला काडीचा एक तुकडा हवा आहे.' असे मागून घ्यावे.

**प्रश्नकर्ता :** एक माणूस फुटपाथवर चालत असेल, दुसरा माणूस गवतावर चालत असेल. यात फरक तर आहेच ना?

**दादाश्री :** हो, पण त्यात जास्त फरक नाही. हे तर लोकांनी डोक्यात उलटे भरवले. मोठया गोष्टी राहून गेल्या आणि लहान गोष्टींना अधिक महत्त्व दिले गेले. लोकांवर चिडणे याला मोठी हिंसा म्हटली आहे. कारण समोरच्याला दु:ख होते ना!

## नियम, शेतीत पुण्य-पापाचा

**प्रश्नकर्ता :** शेतकरी शेती करतात त्यात पाप आहे का?

**दादाश्री :** सगळीकडे पाप आहे. शेतकरी शेती करतात त्यातही पाप आहे आणि धान्य विकण्याचा धंदा करतात त्यातही पाप आहे. धान्यात किडे पडतात की नाही? आणि लोक किड्यांसकट बाजरी विकतात. अरे, धान्यासोबत किड्यांचेही पैसे घेतले, आणि ते खाल्ले!

**प्रश्नकर्ता :** पण शेती करणाऱ्याला एका रोपाचे जतन करावे लागते आणि दुसऱ्या रोपाला उपटून टाकावे लागते. मग यातही पाप आहे का?

**दादाश्री :** आहेच ना!

**प्रश्नकर्ता :** मग शेतकरी शेती कशी करतील?

**दादाश्री :** त्याचे असे आहे, एक कार्य कराल त्यात पुण्य आणि पाप दोन्हीही सामावलेले असतात. हे शेतकरी शेती करतात तेव्हा एका रोपट्याला उपटून टाकतात आणि जे रोप कामाचे असते त्याला वाढवतात. यात त्या रोपट्याला वाढविल्याबद्दल खूप पुण्य बांधले जाते आणि जे रोप उपटून टाकतात, त्याचे त्यांना पाप लागते. हे पाप पंचवीस टक्के बांधले जाते आणि पुण्य पंच्याहत्तर टक्के बांधले जाते. म्हणजे पन्नास टक्क्यांचा फायदा झाला ना!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे ते पाप आणि पुण्य 'प्लस-मायनस' (वजा-बेरीज) होते का?

**दादाश्री :** नाही. ते 'प्लस-मायनस' करण्यात येत नाही. वहीखात्यात तर दोन्हीही लिहिले जाते. जर असे 'प्लस-मायनस' झाले असते ना, तर कोणाकडे थोडेसुद्धा दुःख उरले नसते. म्हणजे मग कोणी मोक्षाला सुद्धा गेला नसता. तो म्हणेल 'इथेच चांगले आहे, इथे काहीच दुःख नाही.' लोक तर खूप पक्के असतात. पण असे काही घडत नाही.

सारे जग पापातही आहे आणि पुण्यातही आहे. पापासोबत पुण्यही होत राहते. पण भगवंताने काय सांगितले की लाभालाभाचा व्यापार करा.

## स्पेशल प्रतिक्रमण, शेतकऱ्यांसाठी

**प्रश्नकर्ता :** मी आपल्या पुस्तकात वाचले होते की 'प्राप्त मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्र दुःख न होवो' परंतु आम्ही ठरलो शेतकरी, आम्ही तंबाखूचे पीक घेतो तेव्हा आम्हाला प्रत्येक रोपट्याचा कोंब म्हणजे त्याचे डोके तोडावेच लागते. मग यामुळे त्या रोपट्याला दुःख तर होतेच ना? त्याचे पाप तर लागेलच ना? लाखो रोपट्यांची डोकी (शेंडे) अशी चिरडून टाकतो. मग या पापाचे निवारण कशा प्रकारे करावे?

**दादाश्री :** यासाठी तर मनात अशी खंत वाटली पाहिजे की जळो, असा धंदा करण्याचा योग माझ्या वाट्याला कुठून आला? बस

एवढेच. रोपट्यांचा कोंब तोडून टाकावा, परंतु हा असा धंदा माझ्या वाट्याला का आला, असा मनापासून पश्चात्ताप झाला पाहिजे. असे करायला नको, अशी मनात खंत वाटली पाहिजे, बस.

**प्रश्नकर्ता :** पण हे पाप तर होतच राहणार ना?

**दादाश्री :** ते तर आहेच. ते तुम्ही पाहायचे नाही. हे जे पाप होत आहे ते पाहायचे नाही. तुम्ही तर असेच ठरवायचे की माझ्याकडून असे होऊ नये, असा निश्चय करायला हवा. हा असा व्यवसाय माझ्या वाट्याला का आला? दुसरा चांगला व्यवसाय मिळाला असता तर आम्ही असे केले नसते. असा पश्चात्ताप होत नाही. जोपर्यंत असे जाणत नाही तोपर्यंत पश्चात्ताप होत नाही. उलट खुश होऊन रोपट्याला उपटून टाकतो. तुम्ही आमच्या सांगण्याप्रमाणे करा ना. मग तुमची सर्व जबाबदारी आमची. रोपटे फेकून दिले त्यास हरकत नाही, पण पश्चात्ताप झाला पाहिजे की हे माझ्या वाट्याला कुठून आले?

**प्रश्नकर्ता :** समजलो.

**दादाश्री :** या शेतकऱ्यांपेक्षा तर व्यापारी जास्त पाप करतात. आणि व्यापाऱ्यांपेक्षा हे घरी बसून राहणारे अधिक पाप करतात. पाप तर मनाने होत असते, शरीराने पाप होत नसते. तुम्हाला ही गोष्ट समजून घेण्याची गरज आहे. इतर लोकांना हे समजण्याची गरज नाही. तुम्ही तुमच्यापुरते समजून घ्या. इतर लोक जे समजतात ते त्यांच्यासाठी बरोबर आहे.

**प्रश्नकर्ता :** कपाशीला औषधाची फवारणी मारावी लागते तर काय करावे? त्यातही हिंसा तर होतेच ना?

**दादाश्री :** नाइलाजाने जी-जी कार्ये करावी लागतात, ती प्रतिक्रमण करण्याच्या अटीवर करावीत.

तुम्हाला या संसार व्यवहारात कसे वागावे ते जमत नाही. ते आम्ही तुम्हाला शिकवतो. म्हणजे नवीन पापे बांधली जाणार नाहीत.

शेती करताना पाप तर बांधलेच जात असते. पण हे पाप बांधतेवेळी आम्ही तुम्हाला औषध (उपाय) देतो की, त्यावेळी तुम्ही असे बोला. म्हणजे पापे कमी होतील. आम्ही पाप धुण्याचे औषध देतो. औषध नको का? शेतात गेलात म्हणजे नांगरणे-वखरणे यात पाप तर होणारच. त्यात कितीतरी जीव मारले जातात. ऊस कापतात त्यास पाप नाही का म्हटले जाणार? ते सर्व जीवच आहेत ना बिचारे? पण त्यासाठी काय करावे ते आम्ही तुम्हाला समजावतो, जेणे करून तुम्हाला कमी दोष लागतील आणि भौतिक सुख चांगल्याप्रकारे उपभोगू शकाल.

शेतीची कामे करताना जीवजंतू मरतात, त्याचा दोष तर लागतो ना? म्हणून शेती करणाऱ्यांनी दररोज पाच-दहा मिनिटे देवाला प्रार्थना करावी की, 'हे दोष झाले त्याची मी माफी मागतो.' शेतकरी असेल त्याला सांगावे की तू हा व्यवसाय करतोस त्यात कित्येक जीवजंतू मरत असतात. त्याचे तू अशा प्रकारे प्रतिक्रमण करत जा. तू जे चुकीचे काम करतोस, त्यास माझी हरकत नाही. पण त्याचे तू अशा प्रकारे प्रतिक्रमण कर.

## स्वरुप ज्ञानीला पुण्य-पाप स्पर्शत नाही

**प्रश्नकर्ता :** आम्ही जंतुनाशक औषध तयार करतो आणि मग ते शेतात फवारतो, त्यामुळे बरेच जीव मारले जातात. तर त्याचे पाप लागते की नाही लागत? आणि ते औषध तयार करणे याला पाप म्हटले जाणार का?

**दादाश्री :** हो. कारण ते औषध जीवांना मारण्याच्या हेतूनेच बनवले जाते. औषध आणतात तेही जीवांना मारण्याच्या हेतूनेच आणतात आणि ते पिकांवर फवारतात ते सुद्धा जीवांना मारण्याच्या हेतूनेच फवारतात. म्हणून हे सर्व पापच आहे.

**प्रश्नकर्ता :** पण यात पिकांची चांगली वाढ व्हावी व भरपूर उत्पन्न मिळावे असा हेतू असतो.

**दादाश्री :** असे आहे, की हे पीक कशाच्या आधारावर होत असते, शेतकरी कशाच्या आधारावर शेत नांगरतो, कशाच्या आधारावर पेरतो, हे सगळे कशाच्या आधारावर चालते ते मला माहीत आहे. या सगळ्या गोष्टींचे रहस्य माहीत नसल्यामुळे लोकांना असे वाटते की 'हे तर माझ्यामुळेच होते. हे मी औषध फवारले म्हणून ते पीक वाचले.' आता हा आधार देणे (असे मानणे) हेच भयंकर मोठे पाप आहे. आणि निराधार झाले म्हणजे ते सर्व गळून पडते.

**प्रश्नकर्ता :** तर मग पुरुषार्थ कुठे गेला?

**दादाश्री :** खरा पुरुषार्थ तर, जे काही होत आहे त्यास पाहणे-जाणणे हाच पुरुषार्थ आहे, दुसरे काही नाही. मनात विचार येतात ती 'फाइल' आहे. त्या विचारांना तर तुम्ही पाहायचे. दुसऱ्या भानगडीत पडायचे नाही.

**प्रश्नकर्ता :** मग ही शेती करायची की नाही?

**दादाश्री :** शेती करण्यास हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण त्याने पापाचे ओझे वाढते त्याचे काय?

**दादाश्री :** असे आहे, या ज्ञानानंतर तुम्हाला पाप शिवत नाही ना! आता तुम्ही 'चंदुभाऊ' राहिले नाही. तुम्ही 'चंदुभाऊ' असाल तोपर्यंत पाप शिवते. 'मी चंदुभाऊ आहे' असे तुम्हाला नक्की वाटते का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तर मग पाप कसे काय शिवणार? हे (कर्म) चार्जच होणार नाही ना! आपल्याजवळ जी शेती आहे तिचा निकाल करावा. ती 'फाइल' आहे. समोर आलेल्या फाइलींचा समभावे निकाल करावा.

परंतु जर माझ्या सांगण्याप्रमाणे, 'मी शुद्धात्मा आहे' अशी जागृती सतत राहत असेल तर मग त्याने कितीही औषध मारले तरी

त्याला (पाप) स्पर्श करणार नाही. कारण 'स्वत:' 'शुद्धात्मा' आहे. आणि औषध मारणारा कोण? तर 'चंदुभाऊ.' (चंदुभाऊच्या जागी वाचकाने स्वत:चे नाव समजावे) आणि तुम्हाला जर दया येत असेल तर मग 'तुम्ही' चंदुभाऊ व्हाल.

**प्रश्नकर्ता :** असे औषध तयार केल्याने, विकल्याने, खरेदी केल्याने, पिकांवर फवारल्याने त्याला कर्माचे बंधन होते की नाही?

**दादाश्री :** हो, ज्यांचे औषध तयार करण्याचे कारखाने आहेत ते सर्वच मला विचारतात की, 'दादा, आता आमचे काय होईल?' मी सांगितले, 'माझ्या सांगण्याप्रमाणे वागाल तर काहीही होणार नाही.'

**प्रश्नकर्ता :** म्हणजे याचा अर्थ असा झाला की, शुद्धात्मा भावाने हिंसा करू शकतो ना?

**दादाश्री :** हिंसा करण्याची गोष्टच नाही. शुद्धात्मा भावात हिंसा होतच नसते. करायचे काहीच नसते ना!

**प्रश्नकर्ता :** मग आचारसंहितेच्या दृष्टीने तर याला दोषच म्हटला जाणार ना?

**दादाश्री :** आचारसंहितेच्या दृष्टीने दोष म्हटला जाणार नाही. आचार-संहिता केव्हा असते? जोपर्यंत तुम्ही चंदुभाऊ आहात तोपर्यंत आचारसंहिता असते. मग त्या दृष्टीने दोषच म्हटला जाईल. परंतु आता या 'ज्ञानानंतर' तुम्ही चंदुभाऊ राहिले नाहीत, तर तुम्ही आता शुद्धात्मा झालात आणि ते तुमच्या लक्षातच असते. 'मी शुद्धात्मा आहे.' हे निरंतर आपल्या लक्षात राहणे याला शुक्लध्यान म्हणतात. 'मी चंदुभाऊ आहे' हे अहंकारी ध्यान आहे.

आपले इतके सगळे महात्मा आहेत, पण कोणीही दुरुपयोग केलेला नाही. ते या संदर्भात मला विचारतात की, 'आम्ही, हा धंदा बंद करू का?' मी सांगितले, 'नाही, धंदा आपणहून बंद होत असेल तर होऊ द्या आणि बंद होत नसेल तर चालू राहू द्या.'

## हिंसक व्यापार

**प्रश्नकर्ता :** पूर्वी जेव्हा ते जंतुनाशक औषधांचा धंदा करत होते, तेव्हा ही गोष्ट त्यांच्या लक्षात येत नव्हती, असेच वाटायचे की कर्माच्या हिशोबाने जो धंदा नशिबी आला आहे त्यात काय वाईट आहे? कोणाच्या वाट्याला मटण विकण्याचे आले तर त्यात त्याची काय चूक? त्याच्या कर्माच्या हिशोबाने जे होते तेच आले आहे ना?

**दादाश्री :** हे असे आहे, की जर आत शंका वाटली नसती तर तसेच चालत राहिले असते. पण त्यांच्या पुण्याईमुळे त्यांना ही शंका आली. जबरदस्त पुण्य आहे. नाही तर जडता आली असती. तिथे कित्येक जीव मेले ते कमी झाले नाहीत, तुमच्या आतच जीव मरतात आणि त्यामुळे जडता येते. जागृती बंद होते. मंद होते.

**प्रश्नकर्ता :** अजूनही मला पूर्वीचे सगळे जुने मित्र भेटतात, तर मी त्या सर्वांना सांगतो की, तुम्ही यातून बाहेर निघा. त्यांना पन्नास उदाहरणे देऊन समजावले की बघा मी इतकी उच्च प्रगती करूनही खाली घसरलो. परंतु सगळ्यांच्याच डोक्यात हे बसत नसेल! म्हणून मग शेवटी ठोकर खाऊन सगळे त्यातून बाहेर निघाले.

**दादाश्री :** म्हणजे किती पाप असेल तेव्हा हा असा हिंसक धंदा करण्याचे आपल्या वाट्याला येते. तर आता आपण ह्या हिंसक धंद्यातून सुटलो तर उत्तम. दुसरे पुष्कळ धंदे असतात. एकदा एक माणूस मला म्हणाला होता, की माझ्या सगळ्या धंद्यांपेक्षा हा किराण्याचा धंदा खूप फायदेशीर आहे. मी त्याला समजावले की, जेव्हा ज्वारी, बाजरी आणि इतर सगळ्या धान्यात किडे पडतात तेव्हा तू काय करतोस? त्यावर तो म्हणाला, त्यात आम्ही काय करणार? आम्ही ते चाळून टाकतो, साफसूफ करतो, काळजी घेतो. सर्व काही करतो. पण तरीही त्यात किडे राहतातच, मग आम्ही काय करू? मी म्हणालो, 'किडे राहतात त्याला आमची हरकत नाही, परंतु वजन करताना धान्याबरोबर किड्यांचेही पैसे तुम्ही घेता का? हो, जरी दोन

तोळे वजन असेल!' अरे, हे काय जीवन आहे? त्या किड्यांचे वजन असते एक-दीड तोळे! पण त्या वजनाचेही पैसे घेतले.

## उत्तम धंदा, जवाहिऱ्याचा

म्हणजे खऱ्या पुण्यवंताला कोणता धंदा मिळतो? ज्यात कमीत कमी हिंसा असेल असा धंदा पुण्यवंताला मिळतो. तर आता असा धंदा कोणता? तो म्हणजे हिरे-माणिकाचा की ज्यात काहीच भेसळ नाही. हल्ली तर त्यात सुद्धा चोरीची सुरुवात झाली आहे. पण ज्याला भेसळ नसलेला धंदा करायचा असेल तो हा धंदा करू शकतो. त्यात जीवजंतू मरत नाहीत. कसलीच उपाधी नाही. यानंतर दुसऱ्या नंबरवर सोन्या-चांदीचा. आणि सर्वात भयंकर हिंसक धंदा कोणता? तो म्हणजे खाटिकाचा. नंतर कुंभाराचा. ती भट्टी पेटवतात ना! म्हणजे ही सगळी हिंसाच आहे.

**प्रश्नकर्ता :** हिंसा कुठल्याही प्रकारची असो पण त्याचे फळ तर मिळतेच ना? हिंसेचे फळ तर भोगावेच लागते ना? मग ती भावहिंसा असो किंवा द्रव्यहिंसा असो?

**दादाश्री :** लोक भोगतच आहेत ना! दिवसभर नुसता मनस्ताप, मनस्ताप...

जेवढेही हिंसक व्यापार करणारे आहेत ना, ते व्यापारी सुखी दिसत नाहीत. त्यांच्या चेहऱ्यावर कधीही तेज येत नाही. जमीन मालक स्वत: नांगर चालवत नसेल तर त्याला जास्त स्पर्शत नाही, परंतु नांगरणाऱ्याला स्पर्शते, म्हणून तो सुखी नसतो. पूर्वीपासूनचा असा नियम आहे. म्हणजे 'धीस इज बट नॅचरल' (हे नैसर्गिकच आहे) असा धंदा मिळणे हे सर्व नैसर्गिक आहे. तुम्ही धंदा बंद करायचे म्हटले ना, तरीही तो बंद होऊ शकेल असे नाही. कारण त्यात कोणाचे काहीही चालत नाही. नाही तर सगळ्याच लोकांच्या मनात विचार येईल की, 'मुलगा (जावई) सैन्यात भरती झाला आणि तो मारला गेला तर माझी मुलगी विधवा होईल.' मग तर

आपल्या देशात असे कोणी जन्माला येणारच नाही. पण नाही, अशी माणसेही प्रत्येक देशात असतातच. नैसर्गिक नियमच असा आहे. म्हणजे हे सर्व निसर्गच उत्पन्न करत असतो. यात काही नवीन नाही. यामागे निसर्गाचा हात आहे. म्हणून जास्त काळजी करण्याची गरज नाही.

## साठा करणे ही सुद्धा हिंसाच

**प्रश्नकर्ता :** व्यापारी नफाखोरी करतो, एखादा उद्योगपती किंवा व्यापारी मेहनतीच्या मानाने कमी पैसे देतो, तसेच कोणी मेहनतीशिवाय कमाई करतो, तर ती हिंसाखोरी म्हटली जाईल का?

**दादाश्री :** ती सर्व हिंसाखोरीच आहे.

**प्रश्नकर्ता :** आता जर त्याने अशी फुकटची कमाई करून धर्मकार्यात पैसे वापरले, तर ती कोणत्या प्रकारची हिंसा म्हटली जाईल?

**दादाश्री :** जेवढे पैसे धर्मकार्यात खर्च केले, जेवढ्या पैशांचा त्याग केला, तेवढा दोष कमी लागला. समजा लाख रुपये कमावले होते, त्यातून ऐंशी हजाराचा दवाखाना बांधला तर तेवढ्या पैशांची जवाबदारी त्याची राहिली नाही. त्याच्यावर फक्त वीस हजार रुपयांचीच जबाबदारी राहिली. म्हणजे हे चांगले आहे, वाईट नाही.

**प्रश्नकर्ता :** लोक लक्ष्मीला साठवून ठेवतात, ती हिंसा म्हटली जाणार की नाही?

**दादाश्री :** हिंसाच म्हटली जाईल. साठवणे ही हिंसाच आहे. कारण दुसऱ्या लोकांच्या कामास येत नाही ना!

**प्रश्नकर्ता :** लक्जुरीयस लाइफ (ऐषोआरामवाले जीवन) जगण्यासाठी संहार करून अधिक लक्ष्मी प्राप्त करतात, यास काय म्हटले जाईल?

**दादाश्री :** तो गुन्हाच म्हटला जाईल ना! आपला जेवढा गुन्हा असेल तेवढी आपल्याला शिक्षा मिळते. जितक्या कमी परिग्रहाने जगता येईल, ते जीवन उत्तम आहे.

## सामना, परंतु शांतीपूर्वक

**प्रश्नकर्ता :** चोरी करू नये, हिंसा करू नये, असे आपण सांगता. पण समजा एखाद्या व्यक्तीने आपली वस्तू चोरली, आपली फसवणूक केली. तर आपण त्याचा सामना केला पाहिजे की नाही?

**दादाश्री :** सामना करायलाच पाहिजे, परंतु आपण असा सामना करू नये की ज्यामुळे आपले मनोभाव बिघडतील. आपण हळूवार सांगितले पाहिजे की, 'भाऊ, मी तुमचे काय बिघडवले आहे की तुम्ही माझ्याबरोबर असे करत आहात?' त्याने आपले शंभर रुपये चोरले असतील आणि आपण त्याच्यावर रागावलो तर त्या शंभर रुपयांसाठी आपण आपले पाचशे रुपयांचे नुकसान केले. तर असे शंभर रुपयांसाठी पाचशे रुपयांचे नुकसान करू नये. आपण शांतपणे बोलायचे. रागवायचे नाही.

## हिंसेचा विरोध, वाचवतो अनुमोदनेपासून...

**प्रश्नकर्ता :** मानसिक दु:ख देणे, कोणाला फसवणे, विश्वासघात करणे, चोरी करणे वगैरे सूक्ष्म हिंसा म्हटली जाते का?

**दादाश्री :** ती सर्व हिंसाच आहे. स्थूल हिंसेपेक्षा ही हिंसा मोठी आहे. याचे खूप भयंकर फळ येते. कोणाला मानसिक दु:ख देणे, कोणाची फसवणूक करणे, विश्वासघात करणे, चोरी करणे हे सर्व रौद्रध्यान म्हटले जाते आणि रौद्रध्यानाचे फळ नरकगती आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु त्या सूक्ष्म हिंसेलाच महत्त्व देऊन मोठी द्रव्यहिंसा, मुक्या प्राण्यांप्रती क्रूरता, हत्या आणि त्यांच्या शोषणाने किंवा हिंसेने मिळवण्यात येणाऱ्या सामग्रीचा वापर केला, किंवा त्यास

प्रोत्साहन देऊन मोठ्या हिंसेप्रती उदासीनता ठेवण्यात आली तर ते उचित म्हटले जाईल का?

**दादाश्री :** ते उचित म्हटले जाणार नाही. त्याचा विरोध असायलाच हवा. विरोध नसेल तर तुम्ही त्याचे अनुमोदन करत आहात, दोन्हींपैकी एका जागेवर (सहमत) आहात. जर विरोध नसेल तर अनुमोदन करत आहात, मग तो कोणीही असो, किंवा ज्ञानी असो, पण त्याला विरोध दर्शविण्याची गरज आहे. अन्यथा तुम्ही अनुमोदनेकडे वळाल.

**प्रश्नकर्ता :** हिंसा करणारा कोणताही पशु-पक्षी असो किंवा इतर कोणीही असो, जर त्यांच्या उदयातच हिंसा आली असेल, तर ती थांबवण्यासाठी आपण निमित्त बनू शकतो का?

**दादाश्री :** कोणाच्याही उदयात ते आलेले असेल आणि तुम्ही ते थांबवण्यासाठी निमित्त झाला नाहीत तर तुम्ही त्या हिंसेचे अनुमोदन केल्यासारखे होईल. म्हणून तुम्ही ते थांबवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मग त्याचा वाटेल तो उदय असो, पण तुम्ही तो थांबवण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे.

जसे रस्त्याने कोणी जात असेल त्याच्या कर्माच्या उदयाने तो पडला व त्याच्या पायाला दुखापत झाली, आणि तुम्ही तिथून जात असाल, तर तुम्ही गाडीतून खाली उतरून स्वत:च्या कपड्याने त्याच्या पायाला पट्टी बांधावी. आणि मग त्याला गाडीत बसवून घरी सोडून आले पाहिजे. भलेही ते त्याच्या कर्माच्या उदयाने झाले असेल, पण आपण भावना दाखवली पाहिजे. नाही तर तुम्ही त्याच्या विरोधी भावनेने बांधले जाल आणि मुक्त होऊ शकणार नाही. हे जग आपल्याला मुक्त करेल असे नाही.

**प्रश्नकर्ता :** अध्यात्ममध्ये रुची असणाऱ्यांसाठी हिंसा थांबण्याचा प्रयत्न करणे हे गरजेचे आहे का? जर गरजेचे असेल तर आपण त्याविषयी मार्गदर्शन, उपदेश किंवा सल्ला द्याल का?

**दादाश्री :** अध्यात्म्यात रुची ठेवत असतील आणि हिंसा थांबवण्यासाठी प्रयत्न केले नाहीत, तर हिंसेला प्रेरणा दिली असे म्हटले जाईल. म्हणून कोणतेही अध्यात्म असो, पण हिंसेला थांबवण्याचा प्रयत्न करायलाच हवा.

**प्रश्नकर्ता :** अशा संयोगात मोठ्या द्रव्यहिंसेचे निवारण का बरे सुचत नसावे?

**दादाश्री :** द्रव्यहिंसेचे निवारण अत्यंत गरजेचे आहे. त्यासाठी आपण दुसरे प्रयत्न करावे, व्यवस्थितपणे सगळ्यांनी एकत्र येऊन मंडळ उभे करावे आणि गर्व्हमेंटकडेही आपण निवडलेल्या माणसांना पाठवले तर त्याचाही भरपूर फायदा होतो. सगळ्यांनी भावना करण्याची गरज आहे, मजबूत भावना करण्याची गरज आहे, प्रोत्साहन देण्याची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** पण दादा, शेवटी तर हा हिशोबच आहे ना?

**दादाश्री :** हो, हिशोबच आहे. पण सर्व प्रयत्न करून झाल्यानंतर हिशोब आहे असे म्हटले पाहिजे. आधीच हिशोब म्हटले तर सर्व बिघडेल. आपल्या गावात भोंदूबाबा आले असतील आणि ते मुलांना पळवून नेत असतील तेव्हा आपण म्हणतोच ना की, यांना पकडा, यांना थांबवा! म्हणजे जसे आपल्या मुलाला कोणी पळवून नेले तर आपल्याला किती दु:ख होते? तसेच या गायी-म्हशी कापल्या जातात त्यासाठी मनात खूप दु:ख वाटले पाहिजे. आणि त्याचा विरोध केला पाहिजे. नाही तर ते काम सफळ होणारच नाही ना! गप्प बसून राहण्याची गरजच नाही. त्यास कर्माचा उदय मानता पण देवसुद्धा असे मानत नव्हते. देव सुद्धा विरोध प्रदर्शित करत होते, म्हणून आपणही विरोध प्रदर्शित केला पाहिजे, एकता निर्माण झाली पाहिजे आणि त्याच्या विरोधात राहिले पाहिजे. यात कोणी हिंसेचा विरोधी नाही, परंतु हा तर अहिंसक भाव आहे!

# कृष्णाचे गोवर्धन - गाईंचे वर्धन

कृष्ण भगवंतांच्या काळात हिंसा खूपच वाढली होती. म्हणून कृष्ण भगवंताने काय केले? गोवर्धन पर्वत एका बोटावर उचलला. आता हा गोवर्धन पर्वत बोटावर उचलला हे शब्द तर स्थूलातच राहिले. लोक त्यामागील सूक्ष्म भाषा समजलेच नाहीत. गोवर्धन म्हणजे गाईंचे संवर्धन कसे करता येईल यासाठी ठिकठिकाणी आयोजन केले, आणि गोरक्षेचेही आयोजन केले. संवर्धन आणि रक्षण दोन्हींचे आयोजन केले. कारण हिंदुस्तानातील लोकांचे मुख्य जीवनच यावर अवलंबून आहे. म्हणून जेव्हा हिंसा अतिशय वाढते तेव्हा दुसरे सर्व सोडून आधी यांना सांभाळा. आणि जे हिंसक प्राणी आहेत, त्यांच्यासाठी तर आपल्याला काही करण्याची गरज नाही. ते प्राणी स्वतःच हिंसक आहेत. त्यासाठी तुम्हाला काही करण्याची गरज नाही. त्यांना कोणी मारतही नाही आणि त्यांना कोणी खाऊ पण शकत नाही ना! या मांजराला कोण खाणार? कुत्र्याला कोण खाणार? कोणी खात नाही आणि कोणी खाऊ शकणारही नाही. म्हणून फक्त हे एकच, गोवर्धन आणि गोरक्षा, या दोन गोष्टींचीच काळजी घेण्यासारखे आहे.

गोवर्धनासाठी खूप उपाय केले पाहिजेत. कृष्ण भगवंताने एका बोटावर गोवर्धन केले, हे फार उत्तम कार्य केले. त्यांनी ठिकठिकाणी गोवर्धनाची स्थापना केली होती आणि गौशाळा चालवल्या होत्या. हजारो गाईंचे पोषण होईल असे आयोजन केले होते. गोवर्धन आणि गोरक्षा, या दोन्हींची स्थापना केली. रक्षा केली म्हणून हिंसा थांबली. आणि त्यामुळे मग ठिकठिकाणी दूध-तूप वगैरे सर्व पदार्थ मिळू लागतील ना! म्हणून गाई वाचवण्यापेक्षा गाईंची संख्या कशी वाढवता येईल यासाठी खूप काही करण्याची गरज आहे.

गाई पाळल्याने इतके फायदे आहेत, गाईच्या दुधाचे अनेक फायदे आहेत, गाईच्या तुपाचे अनेक फायदे आहेत, हे सर्व उघड

करून समजावण्यात आले आणि सक्तीने नाही पण स्वत:च्या मर्जीने लोकांना समजावून प्रत्येक गावात गाई पाळण्याची प्रथा सुरू करण्यात आली तर गाईंची संख्या पुष्कळ वाढेल. पूर्वी सगळीकडे गौशाळा ठेवत होते, तिथे हजार-हजार गाई पाळत असत. म्हणजे गाईंची संख्या वाढवण्याची गरज आहे. आता तर गाईंची संख्या वाढत नाही आणि दुसरीकडे हे असे सर्व चालले आहे. पण आपण कुणालाही नाही म्हणू शकत नाही! नाही म्हटले तर गुन्हा मानला जाईल. आणि कोणी चुकीचे थोडेच करत आहेत? वाचवतच आहेत ना!

**प्रश्नकर्ता :** आम्ही गाईंना सोडवत नाही, परंतु येणाऱ्या गाईंना थांबवतो.

**दादाश्री :** हो, येणाऱ्यांना थांबवा. त्यांच्या मूळ मालकांना समजवा की असे करू नका. सध्या तर तुम्ही गोवर्धन आणि गौरक्षा, आधी हे दोन नियम पाळा. इतर सर्व नंतर, सेकंडरी! हे कार्य पूर्ण झाल्यानंतर मग दुसरे.

म्हणून गोवर्धन आणि गोरक्षा, या दोन्ही गोष्टींना कृष्ण भगवंतानी विशेष महत्त्व दिले होते. गोवर्धन करणारे म्हणजे गोप आणि गोपी. गोप म्हणजे गोपालन करणारे!

**प्रश्नकर्ता :** गोवर्धन, ही नवीनच गोष्ट ऐकायला मिळाली.

**दादाश्री :** हो. या सर्व गोष्टी आहेतच. परंतु जर या गोष्टींचे विवरण झाले तर कामाचे. अशा सर्व गोष्टी तर असतातच आणि त्या खऱ्याही असतात. परंतु लोक त्यास स्थूल रूपात समजले. म्हणे, 'गोवर्धन पर्वत उचलला.' म्हणून मग ते फॉरेनचे सायंटिस्ट म्हणतात, 'या गोष्टीत काही तथ्य नाही, पर्वत कोणी उचलू शकतो का?' आणि जर उचललाच तर हिमालय का उचलला नाही? आणि मग बाण लागताच कसे मरण आले? खरे तर हे असे नसते.

गोवर्धन त्यांनी खूप सुंदर रित्या केले होते. कारण त्या काळी हिंसेचे प्रमाण खूप वाढले होते. हिंसा जबरदस्त वाढली होती. फक्त मुस्लिम लोकच हिंसा करतात असे नाही. हिंदू लोकांतही फक्त अमुक उच्च क्वॉलिटीचे लोकच हिंसा करत नाहीत, बाकीची सर्व जनता हिंसा करणारी आहे.

हिंसक भाव तर नसावाच! माणसात अहिंसक भाव तर असलाच पाहिजे ना! अहिंसेसाठी जीवन व्यतीत करणे, याला अहिंसक भाव म्हटले जाते.

## पूजेच्या पुष्पात पाप आहे का?

**प्रश्नकर्ता :** मंदिरात पूजा करण्यासाठी फुले वाहिली जातात, त्यात पाप आहे की नाही?

**दादाश्री :** मंदिरात पूजा करताना फुले वाहिली जातात हे दुसऱ्या दृष्टीकोनाने पाहायचे आहे. फुले तोडणे हा गुन्हा आहे. फुले विकत घेणे हा सुद्धा गुन्हा आहे. पण दुसऱ्या दृष्टीने पाहिल्याने त्यात लाभ आहे. कोणत्या दृष्टीने हे मी तुम्हाला समजावतो.

आज कित्येक लोक मानतात की फुले वापरण्यात महादोष आहे आणि कित्येक लोक फुले देवाला वाहतात. तर आता यात खरी हकीगत काय आहे? हा वीतरागांचा जो मार्ग आहे तो लाभालाभाचा मार्ग आहे. गुलाबाची दोन फुले तोडून आणली, त्यात त्याने हिंसा तर केली. कारण ती फुले त्याच्या जागेवरून तोडली म्हणून हिंसा तर झालीच. पण ती फुले तो स्वत:साठी वापरत नाही. ती फुले तो देवाला वाहतो किंवा ज्ञानी पुरुषांना वाहतो, ती द्रव्यपूजा झाली, असे म्हटले जाईल. आता ही हिंसा केल्याबद्दल पाच टक्के दंड करा, आणि देवाला फूल वाहिले म्हणून चाळीस टक्के प्रॉफीट (लाभ) द्या. किंवा मग ज्ञानी पुरुषांना वाहिली म्हणून तीस टक्के प्रॉफीट द्या. तरी देखील पंचवीस टक्के वाचले ना, म्हणून

लाभालाभाच्या व्यापारासाठी हे जग आहे. लाभालाभाचा व्यापार केला पाहिजे. आणि जर त्यात लाभ कमी होत असेल व नुकसान जास्त होत असेल तर मात्र ते बंद करा. पण इथे तर नुकसानापेक्षा लाभ जास्त होत आहे. पण तू फुले वाहिलीच नाही, तर तुझा व्यापार बंदच झाला समज.

## फुलांची पाकळीही जिथे दुखावते...

**प्रश्नकर्ता :** आम्ही आतापर्यंत जी फुले तोडली आहेत, त्याचे काही दोष, पाप लागले असेल का?

**दादाश्री :** अरे, फुले एक हजार वर्षे तोडली, आणि एक आयुष्य लोकांशी किंवा घरात कषाय केले, क्लेश केला तर फुले तोडण्याच्या दोषापेक्षाही कषायांचा दोष जास्त लागतो. म्हणून देवाने आधी कषाय बंद करण्यास सांगितले. फुलांची तर काही हरकत नाही. पण तरीही विनाकारण फुले तोडू नये. आवश्यकता असेल, म्हणजे देवाला वाहण्यासाठी तोडली तर हरकत नाही. हौसेसाठी तोडू नये.

**प्रश्नकर्ता :** पण असे म्हटले आहे ना की *'पुष्प पांखडी ज्यां दुभाय, जिनवरनी नही त्यां आज्ञा.'* (फुलांची पाकळी देखील दुखावली जात असेल तिथे जिनवरांची आज्ञा नाही.)

**दादाश्री :** हे तर कृपाळूदेवांनी म्हटले आहे. तीर्थंकरांनी लिहिले होते, तेच तीर्थंकरांचे शब्द कृपाळूदेवांनी लिहिले आहेत. पण ते कोणासाठी? तर ज्याला या संसारातील कुठलीही वस्तू नको असेल, अशा श्रेणीपर्यंत पोहोचला असेल त्याच्यासाठी! आणि तुम्हाला तर अजून हा शर्ट घालायचा आहे ना?

**प्रश्नकर्ता :** तोही इस्त्री केलेला!

**दादाश्री :** हो, आणि तोही इस्त्री केलेला! म्हणजे या संसारातील

लोकांना तर प्रत्येक वस्तू हवी आहे. म्हणूनच सांगतात की, 'भगवंताला फुले वाहा.' आपल्या तीर्थंकर भगवंतांच्या मूर्तीवर फुले वाहतात की नाही? हे तुम्ही अजूनपर्यंत पाहिले नाही का? मूर्तिपूजा करण्यास कधी गेलाच नाही का?! तिथे मूर्तीवर फुले वाहतात.

देवाने साधूंना सांगितले होते की तुम्ही (फक्त) भावपूजा करा आणि जैन लोक द्रव्यपूजासुद्धा करतात. द्रव्यपूजा केल्याने त्यांच्या अडचणी दूर होतात. म्हणून आम्ही काय सांगतो, ज्यांना अडचण असेल त्यांनी ज्ञानी पुरुषांना फुले वाहावी आणि अडचण नसेल त्यांना काही गरज नाही. सगळ्यांचेच काही सारखे असते का? कित्येकांना बऱ्याच अडचणी असतात! त्या सर्व दूर होतात. आणि 'ज्ञानी पुरुषांना' तर यात काही अडतही नाही आणि नडतही नाही.

तरी कित्येक लोक मला म्हणतात की, 'पुष्प पाकळीही जिथे दुखावते तिथे जिनवरांची आज्ञा नाही. भगवंतांची आज्ञा नाही ना?' मी म्हणालो, 'ही तर कॉलेजच्या तिसऱ्या वर्षाची गोष्ट आहे, ती आता शाळेच्या दुसरीच्या वर्गात कशाला आणता? कॉलेजच्या तिसऱ्या वर्षी या गोष्टींकडे लक्ष द्यावे. मग तुम्ही हे सर्व शाळेच्या दुसरीच्या वर्गात कशाला आणता?' तेव्हा तो म्हणाला, 'खरोखर ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे.' मी म्हणालो, 'मग विचार करा. हे दुसऱ्या, तिसऱ्या वर्गात आणण्याची गरज नाही. तुम्ही शेवटच्या वर्षात याल तेव्हा करा ना!' तेव्हा म्हणाला 'याची लिमिट किती असते?' मी म्हणालो, 'शेवटच्या जन्मात महावीर भगवंतांनी लग्न केले होते हे तुम्हाला माहीत नाही का?' तेव्हा म्हणतो, 'हो, लग्न केले होते.' मी विचारले, 'किती वर्षांपर्यंत संसारात राहिले?' तेव्हा म्हणे, 'तीस वर्षांपर्यंत.' मी विचारले, 'संसारात राहिले याचा काही पुरावा आहे का तुमच्याकडे?' तेव्हा म्हणाला की, 'हो, त्यांना मुलगी होती ना!' मी म्हणालो, संसारात राहिले म्हणून ते स्त्रीचे अपरिग्रही तर नव्हतेच ना? ते परिग्रही होते. परीग्रही असतील तरच मुलगी असेल ना? नाही तर पुरावा कसा असेल? म्हणजे

तीस वर्षांपर्यंत ते परिग्रही होते. मग भगवंतानी असे काय पाहिले की ज्या जन्मात स्त्रीचा परिग्रह असेल त्याच जन्मात मोक्षालाही जाता येईल. त्यांनी असे काय शोधून काढले? म्हणजे ही अंतिम श्रेणीची गोष्ट आहे.

म्हणजे देवाच्या मूर्तीलाही फुले वाहू शकतो आणि आपल्या तीर्थंकरांच्या मूर्तीलाही फुले वाहू शकतो. तसे तर हा पुष्प पाकळीला दुखावत नाही आणि पाहायला गेले तर जवळच्यांशी कषाय करून करून त्यांचा दम काढून टाकतो. खरे तर जो फुलाची पाकळी देखील दुखावत नाही तो जर एखादा कुत्रा झोपलेला असेल त्याच्या जवळून निघाला तरी कुत्र्याला जाग येणार नाही, असे असते.

फुलाची पाकळी देखील दुखावली जात नाही हे तर शेवटच्या जन्मात, मोक्ष प्राप्त करण्यासाठी शेवटची पंधरा वर्षे बाकी असतील तेव्हाच बंद करायचे असते. अर्थात अखेरच्या पंधरा वर्षात हे सर्व बंद करायचे असते. आणि जेव्हापासून स्त्रीचा सहवास सोडतो त्यानंतर स्वतःहून फूल वगैरे सर्व सोडून द्यावे. आणि ते तर आपोआपच बंद होत असते. तोपर्यंत व्यवहारात कसलीही ढवळाढवळ करू नये.

## एकेंद्रिय जीवांची सृष्टी

**प्रश्नकर्ता :** हे अपकाय, तेउकाय, पृथ्वीकाय, वायुकाय, वनस्पतिकाय हे सर्व काय आहे?

**दादाश्री :** हे सारे एकेंद्रिय जीव आहेत.

**प्रश्नकर्ता :** पाण्यात जीव आहे हे आमच्या श्रद्धेत बसले आहे म्हणून आम्ही पाणी उकळून पितो.

**दादाश्री :** माझा सांगण्याचा अर्थ असा आहे की, पाण्यातील जीवांबद्दल तुम्ही जे समजले आहात आणि जे सांगत आहात, ते तर

लोकांनी सांगितलेले तुम्ही मानून घेतले आहे. बाकी, ही गोष्ट सहज समजेल अशी नाही. आजचे मोठमोठे वैज्ञानिकसुद्धा समजू शकणार नाहीत! कारण ही अतिशय गुह्य गोष्ट आहे. हे फक्त ज्ञानीच समजू शकतात. तुम्हाला जरी विस्तारपूर्वक समजावले तरी तुम्हाला समजणार नाही, अशी ही गोष्ट आहे. हे जे पाच एकेंद्रिय जीव आहेत ना, यात फक्त वनस्पतिकाय हे एकच तुम्ही समजू शकाल. बाकी वायुकाय, तेउकाय, जलकाय आणि पृथ्वीकाय या चार जीवांना समजण्यासाठी खूप उच्च लेवल (श्रेणी) पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** सायंटिस्ट यावरच संशोधन करीत आहेत ना!

**दादाश्री :** पण सायंटिस्ट समजू शकणार नाहीत. फक्त या झाडांविषयीचेच समजू शकतील. तेही फारसे नाही. काही अंशीच समजू शकतील.

असे आहे, हे मी तुम्हाला भगवंताच्या भाषेत सांगतो. ही झाडे-पाने जी उघड्या डोळ्यांनी दिसतात, ते वनस्पतिकाय आहे. या झाडात सुद्धा जीव आहे. मग हे वायुकाय, म्हणजे या वायुतही जीव आहेत, त्यांना वायुकाय जीव म्हटले. नंतर ही माती आहे ना, ह्या मातीत जीवसुद्धा आहे आणि मातीसुद्धा आहे. या हिमालयात माती आहे, दगड आहे, या सर्वात जीव आहे. दगडसुद्धा जिवंत असतात, त्यांना पृथ्वीकाय जीव म्हटले आहे. या आगीच्या ज्वाळा उठतात त्यावेळी त्या कोळशात अग्नि नसतो. तेउकाय जीव त्या कोळशात जमा झालेले असतात. ते तेउकाय जीव आहेत. हे आपण पाणी पीतो ते निव्वळ जीवाणूंपासूनच बनले आहे. हो, जीव आणि त्याचा देह - दोन्ही एकत्र झाल्याने हे पाणी आहे. भगवंताने त्याला अपकाय जीव म्हटले आहे. ज्यांचे पाणीरूपी शरीर आहे, असे कितीतरी जीव जमा होतात तेव्हा एक ग्लास पाणी तयार होते. आता पाणी हे जीव, अन्न हे जीव, हवा हेही जीव, हे सर्व निव्वळ जीवच आहेत.

## सिद्धी, अहिंसेची

**प्रश्नकर्ता :** तर आता अहिंसा कशी काय सिद्ध होईल?

**दादाश्री :** अहिंसा? ओहोहो! ही अहिंसा सिद्ध झाली तर मनुष्य देवच होईल! सध्या तुम्ही थोडीफार अहिंसा पाळता का?

**प्रश्नकर्ता :** साधारण, जास्त नाही.

**दादाश्री :** मग जरा जास्त पाळण्याचे ठरवा ना! अहिंसा सिद्ध होण्याच्या गोष्टी कशाला करता? अहिंसा सिद्ध झाली म्हणजे मनुष्य देवच झाला!

**प्रश्नकर्ता :** अहिंसा पाळण्याचा उपाय सांगा.

**दादाश्री :** एक तर, ज्या जीवांना आपल्याकडून त्रास होतो, त्यांना त्रास देऊ नये, त्यांना दु:ख देऊ नये. आणि गहू, बाजरी, तांदूळ वगैरे सर्व खाऊ शकता. त्यास हरकत नाही. त्यांना आपल्याकडून त्रास होत नाही, ते बेशुध्दावस्थेत आहेत. आणि या किड्या-मुंग्यांना त्रास होतो म्हणून ते पळतात, तेव्हा त्यांना मारू नये. हे शंख-शिंपल्याचे जे जीव आहेत, जे हालचाल करणारे जीव आहेत, अशा दोन इंद्रियांपासून ते पाच इंद्रियांपर्यंतच्या जीवांना मारू नये. ढेकणालाही तुम्ही पकडले तर त्याला त्रास होतो. म्हणून तुम्ही त्यांना मारू नका. समजले का?

**प्रश्नकर्ता :** हो, समजले.

**दादाश्री :** हो. दुसरे म्हणजे सूर्यनारायण मावळल्यानंतर जेवण करू नका.

आता तिसरे, अहिंसेत जीभेवर खूप कंट्रोल ठेवावा लागतो. तुम्हाला कोणी म्हटले की तुम्ही नालायक आहात, हे ऐकून तुम्हाला सुख वाटते की दु:ख?

**प्रश्नकर्ता :** दु:ख वाटते.

**दादाश्री :** तर तुम्ही इतके समजून घ्यावे की आपण त्याला नालायक म्हटले तर त्याला दुःख होईल. ही पण हिंसाच आहे, म्हणून आपण असे बोलू नये. अहिंसा पाळायची असेल तर हिंसेसाठी खूप सावधानता बाळगली पाहिजे. जे बोलल्याने आपल्याला दुःख होते तसे आपण दुसऱ्यांना बोलू नये.

नंतर मनात वाईट विचारसुद्धा यायला नको. कोणाकडून फुकटचे मिळवायचे, हिसकावून घ्यायचे, असे विचारही यायला नकोत. खूप पैसे जमा करण्याचे विचार पण येता कामा नयेत. कारण शास्त्रकारांनी काय म्हटले आहे, या जन्मात तुझ्या हिशोबात जेवढे पैसे आहेत, तेवढे तर तुला मिळतच राहणार आहेत. तेव्हा खूप पैसे जमा करू असा विचार करण्याची तुला गरजच नाही. असा विचार करशील तर याचा अर्थ हिंसा करणे असा होतो. कारण दुसऱ्यांचे पैसे हडपणे, म्हणजेच दुसऱ्यांचा कोटा आपण मिळवणे, अशी जी इच्छा होते, त्यात पण हिंसाच सामावलेली आहे. म्हणून असे भाव करू नये.

**प्रश्नकर्ता :** बस, हे तीनच उपाय आहेत का अहिंसेचे?

**दादाश्री :** अजूनही दुसरे आहेत. नंतर मांसाहार, अंडे कधीही खाऊ नये. नंतर बटाटे, कांदे, लसूण यांचा वापर करू नये. नाईलाज असेल तरीही घेऊ नये. कारण कांदे, लसूण हिंसक असल्यामुळे माणसाला क्रोधी बनवतात आणि क्रोध केला म्हणजे समोरच्याला दुःख होते. दुसऱ्या ज्या भाज्या तुम्हाला खायच्या असतील त्या तुम्ही खाऊ शकता.

## आधी मोठ्या जीवांना वाचवा

आता भगवंत काय सांगू इच्छितात की सर्वात प्रथम तुम्ही माणसांना जपा. हो, आपल्या मन-वचन-कायेने किंचितमात्र पण दुःख होणार नाही, एवढी बाउंड्री (सीमा) लक्षात ठेवा. नंतर पंचेन्द्रिय जीव गाई, म्हशी, कोंबडी, बोकड, यांचीही हिंसा करू नका. भले

मनुष्यापेक्षा थोडीफार कमी पण त्यांचीही काळजी घ्या. त्यांना दु:ख होणार नाही अशी काळजी घ्यावी. इथपर्यंत जपायचे. मनुष्य व्यतिरिक्त पंचेन्द्रिय जीवांना जपायचे पण ते दुसऱ्या क्रमांकावर. नंतर तिसऱ्या क्रमांकावर कोण येतात? दोन इंद्रियांच्या वरील जीवांना सांभाळायचे.

आहारात सर्वात उच्च प्रकारचा आहार कोणता? तर एकेन्द्रिय जीवांचा! ज्यांना मोक्ष प्राप्त करायचा आहे त्यांना दोन इंद्रियांवरील जीवांचा आहारासाठी उपयोग करण्याचा अधिकार नाही. तेव्हा दोन इंद्रियांपेक्षा जास्त इंद्रिये असलेल्या जीवांची जोखीम आपण पत्करू नये. कारण जितकी त्यांची इंद्रिये, तितक्या प्रमाणात पुण्याची गरज असते, तेवढे माणसाचे पुण्य वापरले जाते!

मनुष्याला आहार घेतल्याशिवाय सुटकाच नाही आणि त्या जीवांचे नुकसान मनुष्याला अवश्य होतेच. एकेन्द्रिय जीवच आपला आहार आहे. त्यांचा आपण आहार म्हणून उपयोग करतो म्हणून ते भोज्य आणि आपण भोक्ता आहोत, आणि तोपर्यंत आपल्यावर जबाबदारी येते. पण भगवंताने ही सूट दिली आहे. कारण तुम्ही महान शिल्लक (पुण्य) वाले आहात आणि तुम्ही त्या जीवांचा नाश करता. पण तुम्ही त्या जीवांना खाता त्यात त्या जीवांचा काय फायदा आहे? त्या जीवांना खाल्ल्याने त्यांचा नाश तर होतोच. पण यात असे आहे, की त्या जीवांना आहार म्हणून तुम्ही खाल्ले म्हणून तुम्हाला त्याचा दंड लागतो. पण ते खाऊनही तुम्ही जास्त नफा कमावता. पूर्ण दिवस जगले आणि धर्म केला तर तुम्ही शंभराची कमाई करता. त्यातील दहाचा दंड तुम्हाला त्यांना चुकवावा लागतो. म्हणजे तुमच्याजवळ नव्वद शिल्लक राहतात. आणि तुमच्या कमाईतून दहा त्यांना मिळाल्याने त्यांची उर्ध्वगती होते. म्हणजे ही तर निसर्गाच्या नियमाच्या आधारावरच उर्ध्वगती होत आहे. ते एकेंद्रियातून दोन इंद्रियात येतात. म्हणजे अशा प्रकारे हे क्रमाक्रमाने वाढतच चालले आहे. या मनुष्यांच्या फायद्यातून ते जीव फायदा मिळवतात. अशा प्रकारे सारा हिशोब चुकता होत राहतो. असे सायन्स लोकांना समजत नाही ना!

म्हणून एकेंद्रियाच्या बाबतीत तुम्ही हात घालू नका. एकेंद्रिय जीवात तुम्ही हात घातला तर तुम्ही इगोइजमवाले आहात, अहंकारी आहात. एकेंद्रिय जीव हे त्रस जीव (ज्यांना त्रास होतो, असे जीव) नाहीत, तेव्हा एकेन्द्रिय जीवांसाठी विकल्प करण्याची तुम्हाला गरज नाही. कारण हा तर व्यवहारच आहे. खावे-प्यावे लागेल, सर्व करावे लागेल.

बाकी, संपूर्ण जग हे जीवजंतूच आहे. एकेंद्रिय जीवांचे तर हे सर्व जीवनच आहे. जीवाशिवाय या जगात दुसरे काहीच नाही. आणि निर्जीव वस्तू तर खाऊ शकत नाही. म्हणून जीव असणारी वस्तूच खावी लागते, त्यानेच शरीराला पोषण मिळते. आणि एकेंद्रिय जीव आहे त्यामुळे त्यात रक्त, पू, मांस नाही, म्हणून एकेंद्रिय जीव खाण्याची तुम्हाला सूट दिली आहे. मग यात जर तुम्ही इतकी काळजी करत बसाल तर कधी पार येईल? त्या जीवांची काळजी करायचीच नाही. खरोखर ज्याची काळजी करायला पाहिजे ते राहूनच गेले आणि ज्याची काळजी करण्याची गरज नाही त्याचीच काळजी करत बसले. या अशा बारीक हिंसेची काळजी करण्याची गरजच नाही.

## कोणता आहार उत्तम?

**प्रश्नकर्ता :** क्रमिक मार्गात काही ठराविक प्रकारचा आहार खाण्यास का मनाई केली आहे?

**दादाश्री :** असे आहे, आहाराचे प्रकार आहेत. त्यात मनुष्याला अत्यंत अहितकारी आहार, की ज्यापेक्षा जास्त अहितकारी दुसरे काहीच नाही, असे अंतिम प्रकारचे अहितकारी म्हणजे मनुष्याचे मांस खाणे. आता यापेक्षा चांगले कोणते? ज्या प्राण्यांची पिल्ले अधिक प्रमाणात वाढत असतील त्या प्राण्यांचे मांस खाणे ते चांगले, म्हणजे या कोंबडया, बदके यांची प्रजोत्पत्ती जास्त असल्यामुळे पिल्लांची संख्या अधिक प्रमाणात वाढते. या गाई-म्हशींच्या पिल्लांची संख्या कमी प्रमाणात वाढते. या माशांची संख्या खूप वाढते. तर त्यांचे मांस खाणे

चांगले. त्याहून पुढे जर कोणी म्हणेल की, 'आम्हाला प्रगती करायची आहे.' तर तेव्हा हे मांस खाणेही नुकसानकारक आहे. त्यापेक्षा तू अंडे खा. मांस खाऊ नकोस. आता याहून पुढे जायचे असेल तर त्याला म्हणेन की, 'तू कंदमूळ खा.' याहून पुढे जायचे असेल तर त्याला आम्ही सांगू, 'या कंदमूळाशिवाय वरण-भात, पोळी, लाडू, तूप, गूळ हे सर्व खा.' आणि याहीपेक्षा पुढची प्रगती करायची असेल तर आपण सांगू की, 'हे सहा *वीगई* आहेत, उदा. गूळ, तूप, मध, दही, लोणी इत्यादी, हे सर्व खाणे बंद कर आणि वरण-भात, भाजी पोळी खा.' यानंतर बाकी काही उरत नाही.

याप्रमाणे आहाराचे प्रकार आहेत. यात ज्याला जो प्रकार आवडेल तो त्याने घ्यावा. हे सर्व मार्ग दाखवले आहेत. याप्रमाणे आहाराचे वर्णन आहे. आणि हे वर्णन समजण्यासाठी आहे करण्यासाठी नाही. भगवंताने आहारात असे भेद का पाडले? तर त्यामुळे आवरणे तुटावी म्हणून. या मार्गाने चाललात तर आतील आवरणे तुटत जातील.

## विज्ञान, रात्रीभोजनाचे

**प्रश्नकर्ता :** रात्रीभोजनाविषयी काही मार्गदर्शन द्या. जैन लोकात त्याचा निषेध आहे.

**दादाश्री :** रात्रीभोजन केले नाही तर ते सर्वात उत्तम आहे. ही चांगली दृष्टी आहे. धर्माशी याचे काही देणेघेणे नाही, तरीही यास धर्मात समाविष्ट केले, याचे काय कारण असेल? तर जेवढी शरीराची शुद्धी असेल तेवढी धर्मात प्रगती करता येते. या कारणाने धर्मात समाविष्ट केले. बाकी, धर्मात याची काही गरज नाही. परंतु शरीराच्या शुद्धीसाठी ही सर्वात चांगली गोष्ट आहे.

**प्रश्नकर्ता :** मग वीतरागांनी लोकांना रात्रीभोजन करू नये असे सांगितले ते पाप-पुण्यासाठी होते की, शारीरिक स्वास्थ्यासाठी होते?

**दादाश्री :** शारीरिक स्वास्थ्यासाठी आणि हिंसेसाठीही सांगितले होते.

**प्रश्नकर्ता :** परंतु रात्रीभोजन का करू नये?

**दादाश्री :** सूर्याच्या हजेरीत संध्याकाळचे जेवण करावे. असे जैनमत आहे आणि वेदांतातही असे सांगितले आहे. जोपर्यंत सूर्याची उपस्थिती असते तोपर्यंत आत पाकळी उघडी असते म्हणून त्यावेळी जेवून घ्यावे, असे वेदांतात सांगितले आहे. जर तुम्ही रात्री आहार घेतला तर काय नुकसान होईल? तर ते कमळ बंद झाल्यामुळे रात्री अन्नपचन लवकर होतच नाही. शिवाय दुसरे काय नुकसान होईल ते या तीर्थंकरांनी सांगितले की रात्री सूर्यास्त झाल्यानंतर जे जीवजंतू फिरत असतात ते सर्व जीव आपापल्या घरी परततात. कावळे, कुत्रे, कबूतर, नंतर आकाशातील जीव, सर्व घरी परततात, आपापल्या घरट्याकडे प्रयाण करतात. अंधार होण्याच्या आत घरात शिरतात. पुष्कळ वेळा आकाशात जबरदस्त ढग असतात. अशावेळी सूर्य मावळला की नाही, हे समजत नाही. पण जेव्हा हे जीव घरट्याकडे परततात तेव्हा समजावे की आत्ता सूर्यनारायण मावळला. ते जीव त्यांच्या आंतरिक शक्तीने समजू शकतात. आता त्यावेळी अगदी लहानात लहान जीवसुद्धा घरात शिरतात आणि अतिशय सूक्ष्म जीव की, जे आपण डोळ्यांनी पाहू शकत नाही, दुर्बिणीनेही पाहू शकत नाही, असे जीव सुद्धा घरात शिरतात. आत शिरल्यावर जिथे अन्न असेल त्यावर बसतात. आपल्या लक्षातही येत नाही की ते आत बसलेले आहेत, कारण त्यांचा रंगच असा असतो की ते जर भातावर बसले तर भाताच्याच रंगाचे दिसतील. भाकरीवर बसले तर भाकरीसारखे आणि पोळीवर बसले तर पोळीसारखेच दिसतील. म्हणून रात्री हे अन्न खाऊ नये.

रात्रीभोजन करू नये, तरीही लोक करतात. आणि कित्येक लोकांना तर हे माहीतही नाही की रात्रीभोजनाने काय नुकसान होते?

आणि ज्यांना माहीत आहे ते दुसऱ्या संयोगात गुंतलेले असतात. बाकी रात्रीभोजन केले नाही तर फारच उत्तम आहे. कारण ते महाव्रत आहे. इतर पाच महाव्रताबरोबर हे सहावे महाव्रत आहे.

**प्रश्नकर्ता :** काही कारणाने रात्रीभोजन करावे लागले तर त्यात कर्मबंधन होते का?

**दादाश्री :** नाही. कर्म बंधन वगैरे काही नाही. तुम्हाला ते कशामुळे तोडावे लागते? आणि रात्रीभोजनाचा त्याग केला, ते तुम्हाला कोणीतरी शिकवले असेल ना?

**प्रश्नकर्ता :** जैन लोकांचे संस्कार असतात ना!

**दादाश्री :** हो. तर मग महावीर भगवंतांचे नाव घेऊन प्रतिक्रमण करावे. ही भगवंतांची आज्ञा आहे म्हणून आज्ञा पाळावी. आणि ज्या दिवशी आज्ञा पाळली गेली नाही त्या दिवशी त्यांची माफी मागून घ्यावी. म्हणजे जर अहिंसा पाळायची असेल तर शक्यतोवर दिवसा जेवण केलेले उत्तम. त्यामुळे तुमचे शरीरही खूप सुंदर राहील. तुम्ही नेहमीच लवकर जेवता का?

**प्रश्नकर्ता :** नुकतीच सुरुवात केली आहे.

**दादाश्री :** कोणी करायला सांगितले?

**प्रश्नकर्ता :** स्वत:च्या इच्छेनेच.

**दादाश्री :** पण आता हे अहिंसेच्या हेतूने करत आहे असे माना. 'दादांनी' मला (अहिंसेची) समज दिली आणि ती मला आवडली, म्हणून मी आता हे अहिंसेसाठीच करत आहे असे समजून करा. कारण ते जर हेतूशिवाय असेल तर व्यर्थ जाते. समजा तुम्ही म्हटले की, मी फॉरेनला जाण्यासाठीच हे पैसे भरत आहे तर फॉरेनला जाण्याचे तिकीट तुम्हाला मिळेल. पण तुम्ही असे काही सांगितलेच नसेल तर मग तुम्हाला कशाचे तिकीट देतील?

## कंदमूळ, सूक्ष्म जीवांचे भांडार

**प्रश्नकर्ता :** कंदमूळ खातात त्यात काही निषेध आहे का?

**दादाश्री :** खूप मोठा निषेध. रात्रीभोजनावर एवढा निषेध नाही. रात्रीभोजन दुसऱ्या नंबर वर येते.

**प्रश्नकर्ता :** कांदे-बटाटे यात अनंत जीव आहेत?

**दादाश्री :** हो, ते अनंतकाय जीव आहेत, मग?

**प्रश्नकर्ता :** मग तुम्ही ते खाण्याचा बोध देता का?

**दादाश्री :** भगवंताने मनाई केली आहे. भगवंताने मनाई केली आहे हे तुमच्या बिलिफमध्ये असायलाच पाहिजे. आणि तरी देखील तुमच्याकडून खाल्ले गेले तर तो तुमच्या कर्माचा उदय आहे. तरी पण तुमची श्रद्धा मात्र बिघडायला नको. भगवंताने जे सांगितले आहे, त्याबद्दल श्रद्धा बिघडायला नको.

**प्रश्नकर्ता :** कंदमूळ खाऊ नये, असे का सांगितले?

**दादाश्री :** कंदमूळ तर मेंदूला जागृत होऊ देत नाही.

**प्रश्नकर्ता :** एकेंद्रिय जीवाची हानी होईल यासाठी नाही?

**दादाश्री :** हे तर लोक असे समजतात की, बटाट्यातील जीवाचे रक्षण व्हावे म्हणून खाऊ नये. आता जर का तुम्हाला बटाटे आवडत असतील तर जास्त पुढेमागे करू नका, कारण ह्या काळात लोकांना दुसरे काही आवडत नाही. आणि तेही सोडले तर काय करतील?

**प्रश्नकर्ता :** पण असे म्हणतात की बटाटे खाल्ले तर पाप लागते?

**दादाश्री :** असे आहे, कुठल्याही जीवाला दु:ख दिले तर पाप लागेलच. खरे तर, नवऱ्याला, बायकोला, मुलांना, शेजाऱ्यांना

दु:ख द्याल तर पाप लागेल. आणि बटाटा खाल्ल्याने तुम्हाला काय नुकसान होईल? तर त्यामुळे मेंदूची स्थूलता येईल, जड बुद्धी होईल. कंदमुळात सूक्ष्म जीव पुष्कळ प्रमाणात आहेत, निव्वळ जीवांचे भांडारच आहे. त्यामुळे कंदमूळ खाल्ल्याने जडता येते आणि कषायभाव (क्रोध, मन, माया, लोभ) उत्पन्न होतात. आपल्याला तर जागृतीची गरज आहे. म्हणून कंदमूळ कमी खाल्ले गेले तर उत्तम. पण तेही भगवंतांच्या आज्ञेत आल्यानंतर जागृतीची गरज आहे. कंदमूळ खाल तर जागृती मंद होऊन जाईल आणि जागृती मंद झाली तर मोक्ष कसा मिळवणार?

म्हणजे भगवंताने या सर्व खऱ्या गोष्टी सांगितल्या आहेत. आणि ह्या सर्व तुमच्याकडून पाळल्या गेल्या तर पाळा आणि नाही पाळल्या गेला तरी हरकत नाही. जितक्या शक्य असतील तितक्या पाळा. जर पाळल्या गेल्या तर चांगलीच गोष्ट आहे.

## सर्वात मोठी हिंसा कषायात

हे तर सर्व उलटेच धरून ठेवले आहे, एका बाजूला असे करतात आणि एका बाजूला कषाय करतात! म्हणजे तीन रुपयाचा नफा करतात आणि करोड रुपयाचे नुकसान करतात! आता याला (खरा) व्यापारी कसे म्हणता येईल? आणि बघा ना, हे असे शेवटपर्यंत धरून ठेवतात आणि तशी तर अपार हिंसा करतात. या जगात सर्वात मोठी हिंसा असेल तर ती म्हणजे कषायांची! कोणी विचारले की भाऊ, हा मनुष्य जीव मारतो आणि हा मनुष्य कषाय करतो, तर जास्त पाप कोणाला लागेल? तर कषाय करणाऱ्याला जास्त पाप लागेल, कारण कषायांची एवढी मोठी किंमत आहे, जीव मारणाऱ्यापेक्षाही कषाय करण्यात जास्त पाप लागते.

## ही गोष्ट समजा

या अशा सर्व गोष्टी भगवंतानी सांगितलेल्या आहेत आणि हे तुम्हाला समजण्यासाठी सांगितले गेले आहे. यात आग्रह धरायचा

नाही. तुम्हाला जेवढे शक्य होईल तेवढे करा. भगवंताने असे नाही सांगितले की तुमच्या क्षमतेपलीकडे करा.

ज्ञानी एखाद्या गोष्टीचे शेपूट (आग्रह) धरून ठेवतील असे नसतात. आणि दुसरे लोक तर शेपूटच धरून ठेवतात. ज्ञानी तर काय सांगत होते की लाभालाभाचा व्यापार पाहा! शरीराला कांद्याचा पंचवीस टक्के फायदा झाला आणि कांदा खाल्ल्याने पाच टक्के नुकसान झाले, म्हणजे आपल्याला वीस टक्क्यांचा फायदा झाला, अशा प्रकारे करत असत. उलट या लोकांनी लाभालाभाचा व्यापारच उडवून टाकला आणि मारून-ठोकून 'कांदा खाणे बंद कर, बटाटा खाणे बंद कर' असेच वारंवार सांगितले. अरे, पण कशासाठी? बटाट्याशी तुमचे वैर आहे? की कांद्याशी वैर आहे? आणि त्याला तर जे सोडले असेल त्याचीच सतत आठवण येत राहते. देवासारखी, सतत त्याचीच आठवण येत राहील!

## 'आम्ही' सुद्धा नियम पाळले होते

मी काही जैन नव्हतो. मी जैनेतर होतो. पण तरीही हे आत्मज्ञान होण्यापूर्वी कायमस्वरूपी कंदमूळाचा त्याग केला होता. नेहमीच चोवियार (सुर्यास्त होण्याआधी जेवणे) असायचा, नेहमी गरम पाणी (उकळून) पित होतो. बाहेरगावी गेलो की कुठेही गेलो तरीही उकळलेले पाणी असायचे. आम्ही आणि आमचा भागीदार, आम्ही दोघेही उकळलेल्या पाण्याच्या बाटल्या सोबत ठेवत होतो. म्हणजे आम्ही तर भगवंताच्या नियमातच राहत होतो.

आता कोणाला हे नियम पाळणे कठीण वाटत असेल तर असे काही नाही की तुम्ही सर्व नियम पाळलेच पाहिजेत. मी तुम्हाला असे सांगणार नाही की तुम्ही असेच करा. तुमच्याकडून होईल तर करा. ही चांगली गोष्ट आहे, हितकारी आहे. भगवंताने ते हितकारी आहे म्हणून सांगितले आहे, त्याला (आग्रहाने) धरून ठेवण्यासाठी सांगितलेले नाही. त्याचे आग्रही होण्यास सांगितले नाही.

आम्हा ज्ञानी पुरुषांना तर त्यागात्याग नसतो. तरी पण कित्येक लोक इतके दु:खी होतात की, 'तुम्ही चोवियार का करत नाही? आम्हाला खूप दु:ख वाटते. मी सांगितले,' 'बरं, मी चोवियार करेन.' काय करावे मग? कारण ज्ञानी झाल्यानंतर त्यागात्याग संभवत नाही. लोक स्वत:च्या समजेनुसार सांगतात. बाकी, आम्हाला कोणत्याही गोष्टीची इच्छाच नसते! आम्हाला तर भगवंताने हिंसेच्या समुद्रात अहिंसक म्हटले आहे. आम्ही पूर्वीपासूनच कायम चोवियार करीत होतो. परंतु आता आम्हाला सत्संगासाठी जायचे असते त्यामुळे कधी चोवियार करतो आणि वेळ प्रसंगी दोन-चार दिवस आम्हाला चोवियार करता येत नाही. पण आमचा हेतू तर चोवियार करायचाच असतो. ती मुख्य वस्तू आहे.

## उकळलेले पाणी, पिण्यात...

**प्रश्नकर्ता :** पाणी उकळून प्या असे जे सांगितले आहे ते कशासाठी?

**दादाश्री :** ते काय सांगू इच्छितात? पाण्याच्या एका थेंबात अनंत जीव आहेत. म्हणून पाण्याला खूप उकळले की ते जीव मरून जातात. आणि नंतर ते पाणी प्यायले तर तुमचे शरीर चांगले निरोगी राहील आणि त्यामुळे आत्मध्यान राहील. उलट लोक या गोष्टीला भलतेच समजून बसले.

भगवंताने तर शरीर निरोगी राहण्यासाठीच सर्व प्रयोग सांगितले आहेत. म्हणून पाणी उकळून पिण्यास सांगितले. पाणी उकळले नाही तर त्यास जीवहिंसा पाळली असे म्हटले जाईल. स्वत:चे शरीर जरी बिघडले तरी चालेल पण आम्ही तर पाणी उकळणार नाही. परंतु भगवंताने तर पाणी उकळून पिण्याचे सांगितले आहे, कारण त्यामुळे तुमचे आरोग्य चांगले राहील. आणि आठ तासानंतर पुन्हा त्यात जीव पडतील म्हणून आठ तासानंतर ते पाणी पिऊ नका, नंतर दुसरे पाणी उकळून घ्या, असे सांगतात.

अर्थात पाणी गरम करणे हे हिंसेसाठी सांगितले नाही, हे तर शारीरिक आरोग्यासाठी सांगितले आहे. पाणी गरम केल्याने त्यातले जलकाय जीव मरतात. परंतु हे त्याच्या पापासाठी सांगितलेले नाही, तुमच्या शरीरासाठी खूप लाभदायक आहे, पोटात जीवाणू उत्पन्न होऊ नये आणि ज्ञानावर आवरण येऊ नये, यासाठी सांगितले आहे. पाणी गरम केल्याने जे मोठे जंतू असतात ते सर्व मरून जातात.

**प्रश्नकर्ता :** तर ती हिंसाच झाली ना?

**दादाश्री :** या हिंसेची हरकत नाही. कारण शरीर निरोगी राहिले तर तुम्ही धर्मकार्य करू शकता. नाही तरी सर्व हिंसाच आहे ना. या जगात नुसती हिंसाच आहे. हिंसेच्या पलीकडे एक अक्षरही नाही. तुम्ही जे खाता, पिता हे सर्व जीवच आहेत.

तर भगवंताने एकेंद्रिय जीवांसाठी असे सर्व करण्यास सांगितलेलेच नाही. हे तर सर्व उलटेच समजून घेतले आहे. एकेंद्रिय जीवासाठी जर असे सांगितले असते ना, तर 'न उकळता थंड पाणीच प्या, पाणी उकळल्याने सर्व जीव मरून जातात' असे सांगितले असते. पाणी गरम करण्यात किती जीव मारले?

**प्रश्नकर्ता :** अनेक.

**दादाश्री :** त्यात जीव दिसत नाहीत. पण हे पाणी आहे ना, ते अपकाय जीव आहेत, त्यांची काया, त्यांचे शरीरच पाणी आहे. बोला आता, त्यात जीव कुठे बसले असतील? लोकांना ते कसे सापडतील? हे तर शरीर दिसते. या सर्व जीवांचे शरीर एकत्र केले, तेच पाणी आहे, पाणीरूपी ज्यांचे शरीर आहे असे ते जीव आहेत. आता याचा कधी अंत येईल?

## हिरव्या भाजीपाल्याबद्दल समजले उलटेच

**प्रश्नकर्ता :** पावसाळ्यात हिरव्या फळभाज्या-पालेभाज्या, खाऊ नये असे सांगितले आहे ते कशासाठी?

**दादाश्री :** हिरव्या भाजीपाल्याविषयी पण लोकांनी उलटेच समजून घेतले आहे. हिरव्या भाज्या म्हणजे जीवांची हिंसा नव्हे. हिरव्या भाज्यांवर सूक्ष्म जीवजंतू बसतात आणि ते जीवजंतू पोटात गेले तर रोग होतात, शरीराला त्रास होतो म्हणून मग धर्मकार्य करू शकत नाही. यासाठी भगवंताने पावसाळ्यात हिरव्या भाज्या खाण्यास मनाई केली आहे. आम्ही काय सांगू इच्छितो की, तुम्ही असे उलटे का समजता. म्हणजे जे चोपडण्याचे औषध होते ते सर्व पिऊन टाकले आणि जे पिण्यास सांगितले होते, ते चोपडत राहिले म्हणून तर रोग बरा होत नाही.

## 'एन्टीबायोटिक्सने' होणारी हिंसा

**प्रश्नकर्ता :** ताप आला, फोड झाले, त्यात पू झाला, की डॉक्टर आतील जंतू मारून टाकण्याचे औषध देतात... एन्टीबायोटिक्स देतात.

**दादाश्री :** अशा जंतूंची चिंता करायची नाही.

**प्रश्नकर्ता :** पोटात कृमी झाले असतील आणि त्याला जर औषध दिले नाही तर तो मुलगा मरून जाईल.

**दादाश्री :** त्याला असे औषध पाजा की ज्यामुळे आत कृमी वगैरे काही राहणारच नाही, ते करावेच लागेल.

**प्रश्नकर्ता :** आता आत्मसाधनेसाठी देहाला चांगले ठेवावे पण ते करताना इतर जीवांची हानी होत असेल तर ते करावे की नाही ?

**दादाश्री :** असे आहे की, आत्मसाधना कशाला म्हणतात ? तर शरीराची काळजी घ्यायची आहे, असा भाव जर तुम्ही ठेवला तर साधना कमी होईल. पूर्ण साधना करायची असेल तर तुम्ही शरीराची काळजी घेऊ नका. शरीर त्याचे सर्व सोबत घेऊनच आले आहे, सर्वच प्रकारचा सांभाळ घेऊन आले आहे. तुम्हाला त्यात काही

ढवळाढवळ करण्याची गरज नाही. तुम्ही आत्मसाधनेत पूर्णपणे, हन्ड्रेड पर्सेन्ट लक्ष घाला. आणि हे दुसरे सर्व कम्प्लीटच आहे. म्हणूनच मी सांगतो ना, की भूतकाळ निघून गेला, भविष्यकाळ 'व्यवस्थित शक्तीच्या' ताब्यात आहे, तेव्हा तुम्ही वर्तमानात राहा.

तरी पण आम्ही काय सांगतो की, ज्या देहाने ज्ञानी पुरुषांना ओळखले, त्यास मित्र समान माना. ही औषधे हिंसक असतील तरीही त्याचा उपयोग करा पण शरीराची काळजी घ्या. कारण हा लाभालाभाचा व्यापार आहे. या शरीराने ज्ञानी पुरुषांना ओळखले आहे आणि असे हे शरीर जर आणखी दोन वर्ष जास्त टिकले तर दोन वर्षात तर ते (मोक्षाचे) जबरदस्त काम करू शकेल. एकीकडे हिंसा झाल्याबद्दल नुकसान होईल, पण या नुकसानीपेक्षा वीस पटीची कमाई आहे. तर त्या वीसमधून एकोणीस तर आपल्याकडे राहिले. म्हणजे हा लाभालाभाचा व्यापार आहे.

बाकी तर, निव्वळ जीवजंतूच आहेत. हे जग म्हणजे निव्वळ जीवच आहेत. हा श्वास घेण्यात तर कितीतरी जीव मरून जातात, मग आपण काय करावे? श्वास घेतल्याशिवाय बसून राहायचे? बसून राहिले असते तर चांगले, त्यांचा निवाडा (!) लागला असता. हा तर उगाचच वेडेपणा केला आहे.

आता या सर्वांचा तर कधी अंतच येणार नाही. तेव्हा तुम्ही जे काही करत असाल ते करत राहा. यात काही ढवळाढवळ करण्याची गरजच नाही. फक्त ज्या जीवांना आपल्याकडून त्रास होतो, अशा जीवांना शक्यतोवर दुःख देऊ नका.

## आहार, डेव्हलपमेंटच्या आधारे

फॉरेनवाले काय म्हणतात? 'देवाने हे जग बनवले म्हणून या मनुष्यांना बनवले. आणि बोकड-मासे हे सर्व आमच्या खाण्यासाठी देवाने बनवले आहेत.' अहो, तुमच्या खाण्यासाठी बनवले आहेत तर मग तुम्ही हे मांजर, कुत्रे, वाघ यांना का खात नाही! खाण्यासाठी

बनवले असेल तर सर्व सारखेच बनवले असते ना? देव कधी असे करत नाही. देवानेच जर बनवले असेल तर तुमच्यासाठी सर्व खाण्यालायक वस्तूच बनवेल. पण इथे तर त्याचबरोबर अफू सुद्धा बनवतो की नाही? आणि कूच (एक प्रकारचे जंगली रोपटे ) सुद्धा असते ना? त्यालाही बनवतो ना? जर देव बनवत असेल तर हे सगळे कशासाठी बनवेल? कूच आणि या सगळ्यांची काय गरज आहे? मनुष्याला सुख देणाऱ्याच सर्व वस्तू बनवेल ना! म्हणजे हे सर्व चुकीचे समजून बसले की, हे देवाने बनवले. आणि हे फॉरेनवाल्यांना तर अजून पुनर्जन्मही समजत नाही. म्हणून त्यांना असे वाटते की, हे सर्व आपल्या खाण्यासाठीच आहे. ते जर पुनर्जन्म समजतील तर त्यांच्या मनात विचार येईल की, जर आपला असा जन्म झाला तर काय होईल? पण त्यांना असा विचारच येत नाही.

आपल्या हिंदुस्तानातील लोकांना असा विचार आला, म्हणून तर हे ब्राह्मण लोक म्हणतात आम्ही मांसाहार करू शकत नाही, वैश्य म्हणतात आम्ही पण करू शकत नाही. शूद्र म्हणतात आम्ही मांसाहार करू शकतो. ते लोक तर मेलेल्या प्राण्यालाही खातात. आणि हे क्षत्रिय सुद्धा मांसाहार करतात.

## चीड, मांसाहारीवर

**दादाश्री :** तुम्ही व्हेजिटेरियन (शाकाहार) पसंत करता की नॉन व्हेजिटेरियन (मांसाहार)?

**प्रश्नकर्ता :** मी अजून नॉनव्हेजिटेरियन चाखलेले नाही.

**दादाश्री :** पण ती चांगली वस्तू आहे असे कधी बोलले नाही?

**प्रश्नकर्ता :** नाही. मी व्हेजिटेरियन आहे. पण याचा अर्थ असा नाही की, नॉनव्हेजिटेरियन वाईट आहे.

**दादाश्री :** बरोबर आहे. मी त्यास वाईट म्हणत नाही.

मी विमानाने येत होतो. माझ्या सीटवर मी एकटाच होतो, माझ्याजवळ दुसरे कोणीही नव्हते. एक मोठा मुसलमान शेठ होता, तो त्याच्या सीटवरून उठून माझ्या शेजारी बसला, मी काही बोललो नाही. नंतर तो हळूच मला म्हणाला की, 'मी मुसलमान आहे आणि आम्ही नॉनव्हेज खातो. तर तुम्हाला याबद्दल काही दु:ख होत नाही?' मी म्हणालो, 'नाही, नाही. मी तुमच्यासोबत जेवायला बसू शकतो. फक्त इतकेच की मी ते घेत नाही. तुम्ही जे करत आहात ते तुमच्यानुसार योग्यच करत आहात. त्यात आमचे काहीच देणेघेणे नाही.' तेव्हा शेठ म्हणाले, 'तरीही आमच्याविषयी तुम्हाला अभाव तर होतच असेल ना?' मी म्हणालो 'नाही, नाही. तुमची ही मान्यता सोडून द्या. कारण तुम्हाला ते जन्मजात मिळालेले आहे. तुमच्या आईने नॉनव्हेजिटेरियन खाल्ले आहे आणि तुमचे रक्तच नॉनव्हेजिटेरियनवाले आहे. पण आता हरकत कोणासाठी आहे? तर ज्याच्या रक्तात नॉनव्हेज नसेल, ज्यांच्या आईच्या दुधात नॉनव्हेज नसेल, त्याला मात्र खाण्याची सूट नाही. आणि तुम्ही खाता ते फायदेकारक-नुकसानकारक याचा विचार केल्याशिवायच खाता. फायदा-नुकसान समजून घेत नाहीत.'

जे लोक मांसाहार करत आहेत, त्यांच्यावर चिडण्यासारखे नाही. ही तर फक्त आपली कल्पनाच आहे. बाकी, ज्या लोकांचा हा आहार आहे, त्यास आमची हरकत नाही.

## स्वतः कापून खाल?

**प्रश्नकर्ता :** पण आज तर सोसायटीत वावरत असल्यामुळे मांसाहार करत असतात.

**दादाश्री :** हा तर शौक म्हटला जातो. तुमच्या आईच्या दुधात आलेले असेल तर तुम्हाला नेहमीसाठी खाण्यास हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** आई मांसाहार करत नसेल तर काय करावे?

**दादाश्री :** तर मग तुम्ही कसे खाऊ शकता? तुमच्या ब्लडमध्ये आले नसेल तर ते तुम्हाला कसे पचेल? तुम्हाला आज पचन झाले असे वाटते, पण शेवटी तर नुकसानच होत असते. हे तुम्हाला आज समजणार नाही. म्हणून नाही खाल्ले तर उत्तम आहे. सुटत नसेल तर, 'हे नुकसानकारक आहे, सोडले तर उत्तम आहे' अशी भावना ठेवावी.

आपल्या या गाई कधीच मांसाहार करत नाहीत, हे घोडे आणि म्हशीसुद्धा मांसाहार करत नाहीत, आणि ते तसा शौकही ठेवत नाहीत. खूप उपाशी असतील तरी पण मांसाहार समोर ठेवला तर ते खाणार नाहीत. इतके तर या जनावरांमध्येही असते. पण आता तर ही हिंदूंची मुले आणि जैनांची मुले, ज्यांचे आई-वडील कधी मांसाहार करीत नाहीत, तेही आता मांसाहार करायला शिकले आहेत. तेव्हा मी त्यांना म्हणालो, 'तुम्हाला मांसाहार करायचा असेल तर माझी हरकत नाही, पण तुम्ही स्वतः कापून खा. कोंबडी असेल, तर तुम्ही स्वतः कोंबडी कापून खा.' अहो, रक्त पाहण्याची तर शक्ती नाही आणि मांसाहार करता? रक्त पाहिले तरी किती घाबरतात! म्हणजे मी काय खात आहे याचेही भान नाही. आणि तू जेव्हा रक्त पाहशील ना, तेव्हा तुला ते बघवणारच नाही. हे तर जे रक्त पाहतात ना, त्यांचेच काम. जे रक्तात खेळले असतील अशा क्षत्रियांचे ते काम आहे. रक्त पाहिल्यावर घाबरायला होते की नाही?

**प्रश्नकर्ता :** उबग येतो. घाबरायला होते.

**दादाश्री :** तर मग अशी व्यक्ती मांसाहार करूच कशी शकते? दुसरा कोणी कापतो आणि ते तुम्ही खाता हे मिनिंगलेस आहे. जेव्हा कोंबड्याला कापले जाते त्यावेळी तुम्ही त्याची किंकाळी ऐकाल ना, तर आयुष्यभर तुमचे वैराग्य जाणार नाही, एवढे प्रचंड दुःख असते. मी ते स्वतः ऐकले होते. तेव्हा मला वाटले की अरेरे, त्यांना किती दुःख होत असेल?!

## महिमा, सात्विक आहाराचा

**प्रश्नकर्ता :** भगवंतांच्या भक्तीत शाकाहारी लोकांना आणि

मांसाहारी लोकांना काही अडथळा येऊ शकतो का? याविषयी आपले काय मंतव्य आहे?

**दादाश्री :** असे आहे की, मांसाहारी कसा असला पाहिजे? त्याच्या आईच्या दुधात मांसाहाराचे दूध असले पाहिजे. अशा मांसाहारीला भगवंताच्या भक्तीसाठी हरकत नाही. त्याच्या आईचे दूध मांसाहारी नसेल आणि नंतर तो मांसाहारी झाला तर त्यास हरकत आहे. बाकी, भक्तीसाठी शाकाहारी आणि मांसाहारी कोणालाच हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** तर मग शुद्ध आणि सात्विक आहाराशिवाय भक्ती होऊ शकते की नाही होऊ शकत?

**दादाश्री :** नाही होऊ शकत. पण आता या काळात तर काय करु शकतो? शुद्ध सात्विक आहार आपल्याला प्राप्त होणे किंवा ते असणे हे खूप कठीण आहे आणि अशा कलियुगात घसरणार नाही, कलियुगाचा प्रभाव पडणार नाही अशी माणसे फार कमी असतात. नाही तर त्यांना तसे मित्र भेटतात किंवा असे कोणी भेटतात की जे त्याला चुकीच्या मार्गी लावतात. त्यांच्यात कुसंग शिरतो.

**प्रश्नकर्ता :** अजाणतेपणी अघटित आहार खाल्ला गेला असेल तर त्याचा काही परिणाम होतो का?

**दादाश्री :** सगळ्यांचे अजाणतेपणीच होत राहिले आहे. तरीही त्याचा परिणाम होतो. जर चुकून आपला हात विस्तवावर पडला तर? लहान मुलासही विस्तव भाजत नाही का? लहान मुले सुद्धा भाजतात. असे हे जग अजाणतेपणी केले किंवा जाणतेपणी केले, सर्वांना सारखेच फळ देते. फक्त भोगण्याची रीत वेगळी असते. अजाणतेपणी करणाऱ्याला अजाणतेपणी भोगावे लागते आणि जाणतेपणी करणाऱ्याला जाणून भोगावे लागते. इतकाच फरक आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे अन्नाचा परिणाम मनावर पडतो, हे पण निश्चित आहे?

**दादाश्री :** हा सर्व आहाराचाच परिणाम आहे. हे जे अन्न खातो, ते पोटात गेल्यानंतर त्याची ब्रँन्डी तयार होते आणि ब्रँन्डीमुळे दिवसभर बेशुद्धपणे तन्मयाकार राहतो. हा जो सात्विक आहार आहे, त्याचीसुद्धा अगदी थोड्या प्रमाणात ब्रँन्डी होत असते. आणि ती बाटलीतली ब्रँन्डी पितो तेव्हा तर शुद्धीच राहत नाही. तसेच हे जे अन्न पोटात जाते, त्याची सुद्धा ब्रँन्डीच होऊन जाते. लाडू, हिवाळीपाक वगैरे सर्व सात्विक नाहीत! सात्विक म्हणजे खूप हलके जेवण आणि लाडू तर नशा वाढवणारे आहेत. पण लोक आपल्या आवडीप्रमाणे स्वीकार करतात, सोयीस्कर करून घेतात.

**प्रश्नकर्ता :** मांसाहाराचा आध्यात्मिक विचारात काही परिणाम होतो का?

**दादाश्री :** नक्कीच. मांसाहार हा स्थूल आहार आहे, म्हणून आध्यात्मिक बुद्धी उत्पन्न होत नाही. अध्यात्म्यात जायचे असेल तर लाइट फूड-हलके जेवण असावे की ज्याच्यामुळे नशा चढणार नाही आणि जागृती वाढेल. बाकी, या लोकांना जागृती आहेच कुठे?

ते फॉरेनचे सायंटिस्ट आपली गोष्ट समजू शकत नाहीत. ते सायंटिस्ट म्हणतात, 'ओहो! ही तर खूप विचार करण्यासारखी गोष्ट आहे. परंतु आम्ही असे मानू शकत नाही. मी म्हणालो, 'अजून तर पुष्कळ वेळ लागेल. पुष्कळ कोंबडया खाल्या आहेत म्हणून वेळ लागेल. यासाठी तर वरण-भात लागेल. प्यूअर व्हेजिटेरियनची आवश्यकता आहे.' व्हेजिटेरियन (शाकाहारी) अन्नाचे आवरण पातळ असते, म्हणून ते ज्ञान समजू शकतात, सर्व आरपार पाहू शकतात आणि त्या मांसाहार करणाऱ्यांचे आवरण जाड असते.

## मांसाहारामुळे नरकगती?

**प्रश्नकर्ता :** असे म्हटले जाते की मांसाहार केल्याने नरकगतीत जावे लागते.

**दादाश्री :** ही गोष्ट पूर्णपणे सत्य आहे आणि खाण्यासाठी दुसरे अनेक पदार्थ आहेत. मग बोकडाला का कापता? कोंबडीला कापून खातात, तर काय तिला त्रास होत नसेल? त्यांच्या आई-वडिलांना त्रास होत नसेल? तुमच्या मुलाला कोणी खाऊन टाकले तर काय होईल? मांसाहार करणे म्हणजे कुठलाही विचार न करता करणे. निव्वळ पशुताच आहे, अविचारी अवस्था आहे. आणि आपण तर विचारशील आहोत. फक्त एकदाच जरी मांसाहार केला तरी माणसाची बुद्धी नष्ट होऊन जाते, पशुसमानच होऊन जातात. म्हणून डोके (बुद्धी) जर चांगले ठेवायचे असेल तर अंडे खाण्यापर्यंतचा सर्वच मांसाहार बंद केला पाहिजे. अंड्यांपासून खालील सर्व पशुताच आहे.

मांसाहारात त्या जीवाला मारण्याचा दोष लागतो त्याहीपेक्षा आत जे आवरण येते त्याचा जास्त दोष लागतो. मारण्याचा गुन्हा तर ठीक आहे. हा गुन्हा कशा प्रकारे घडतो? मूळ व्यापार करतो त्यात वाटले जाते. खाणाऱ्याच्या वाट्याला तर काही प्रमाणातच दोष जातो. पण हे तर आत स्वत:वर असे आवरण आणते, की माझी गोष्ट समजण्यासाठी त्याला खूप आवरणे येतात. या व्यवहाराच्या गोष्टी कित्येक लोक स्पीडीली (पटकन) समजून जातात, त्याला ग्रास्पिंग पावर म्हटले जाते.

## हिशोबानुसार गती

**प्रश्नकर्ता :** पण असे घडू शकते का की, हिंसक माणूस अहिंसक योनीत जातो किंवा अहिंसक माणूस हिंसक योनीत जातो?

**दादाश्री :** हो, खुशाल जातो. या जन्मात अहिंसक असेल आणि दुसऱ्या जन्मात हिंसक होतो. कारण तिथे त्याला हिंसक आई-वडील मिळाले. म्हणजे आजुबाजूस तसे संयोग जुळून आले त्यामुळे तो तसा झाला.

**प्रश्नकर्ता :** याचे कारण काय?

**दादाश्री :** असे आहे, जो अहिंसक असतो, तो जर पशुगतीत गेला तर गाय होईल किंवा म्हैस होईल. आणि हिंसक असेल तो वाघात जाईल, कुत्र्यात जाईल किंवा मांजरीत जाईल, जिथे हिंसक प्राणी असतील तिथे जाईल. आणि मनुष्यात अहिंसक असेल, तरीही तो हिंसकाकडे जन्म घेतो. तेव्हा मग त्याच्यावर हिंसकाचे संस्कार पडतात. तोही ऋणानुबंधच आहे ना! हिशोबच आहे ना! राग-द्वेष होतो तोच ऋणानुबंध. ज्याच्यावर राग (मोह, आसक्ती) केला तिथे चिकटतो. आणि ज्याच्यावर द्वेष केला तिथेही चिकटतो. द्वेष केला की 'हा नालायक आहे, बदमाश आहे, असा आहे, तसा आहे,' तर मग तिथेच जन्म होतो.

## स्पर्शत नाही काही अहिंसकाला

**प्रश्नकर्ता :** हा कुत्रा चावतो त्यात कोणता ऋणानुबंध असतो?

**दादाश्री :** ऋणानुबंधाशिवाय तर एक राईचा दाणासुद्धा तुमच्या तोंडात जात नाही, खालीच पडतो.

**प्रश्नकर्ता :** जर आपल्याला कुत्रा चावला तर आपण त्याच्यासोबत काही कर्म बांधले असेल का?

**दादाश्री :** नाही, तसे त्याच्यासोबत कर्म बांधलेले नसते. पण आपल्या इथे मनुष्य असूनसुद्धा चावत नाहीत का? लोक असेही म्हणतात ना की, हा मेला मला चावत राहतो! एक जण तर मला म्हणत होता, माझी बायको तर अशी की तिला नागीण म्हटले तरी चालेल. रात्री चावतच राहते. आता खरोखर ती चावत नाही. पण ती असे काही बोलते की, ते आपल्याला चावल्यासारखे दु:ख वाटते. आपण असे बोललो, त्याच्या फळस्वरूपात आपल्याला कुत्रे चावतात, दुसरे सर्वही चावतात. निसर्गाच्या घरी सामान तयारच असते, सगळीकडे बॉम्बार्डिंग करण्यासाठी. तुम्ही जी कर्मे बांधली आहेत ती कर्मे चुकती करण्यासाठी निसर्गाकडे साधन तयारच आहे.

म्हणून जर तुम्हाला या जगापासून या दुःखांपासून मुक्त व्हायचे असेल तर तुम्हाला जरी कोणी दुःख दिले तरी पण तुम्ही त्यांना दुःख देऊ नका. तुम्ही त्यांना थोडे जरी दुःख दिले तरी पुढील जन्मी ती नागीण बनून तुम्हाला चावेल, हजारो प्रकारे वैर वसूल केल्याशिवाय राहणार नाही. या जगात अजिबात वैर वाढवण्यासारखे नाही. नंतर ही जी दुःखे येतात, ती कोणाला तरी दुःख दिले होते, त्यामुळेच ही सर्व दुःखे येतात ना! नाही तर दुःख नसतेच या जगात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे, हे जीवन एक शाश्वत संघर्षच आहे.

**दादाश्री :** हो, पण जर तुम्ही अहिंसक वातावरण तयार कराल तर साप देखील तुम्हाला चावणार नाही. समोरच्याने तुमच्यावर साप टाकले तरीही तो तुम्हाला चावणार नाही, पळून जाईल बिचारा. वाघ सुद्धा तुमच्या वाट्याला जाणार नाही. या अहिंसेत एवढे सारे बळ आहे की विचारूच नका! अहिंसेसारखा कोणतेच बळ नाही आणि हिंसेसारखा कमकुवतपणा नाही. ही सर्व दुःखे फक्त हिंसेमुळेच आहेत, निव्वळ हिंसेमुळेच दुःख आहे.

बाकी, या जगात तुम्हाला चावू शकेल असा कोणी नाहीच. आणि जर कोणी चावू शकतो तर तो तुमचाच हिशोब आहे. म्हणून हिशोब चुकता करून टाका. आणि चावल्यानंतर आत तुम्ही जो भाव करता की 'या कुत्र्यांना तर मारूनच टाकले पाहिजे, असे करायला पाहिजे, तसे करायला पाहिजे.' तो मग तुम्ही नवीन हिशोब चालू केला. कुठल्याही परिस्थितीत समता ठेवून समाधान आणा, आत सहजही विषमता नसावी!

**प्रश्नकर्ता :** परंतु अशा परिस्थितीत तर जागृती-समता राहत नाही.

**दादाश्री :** हा संसार पार करणे खूप कठीण आहे, म्हणून हे अक्रम विज्ञान देत आहोत.

## गुन्हेगार, खाटिक की खाणारा?

**प्रश्नकर्ता :** जर एखादा खाटिक 'दादां' कडे ज्ञान घेण्यास आला, व 'दादांनी' त्याला ज्ञान दिले. पण त्याचा धंदा चालूच आहे आणि चालूच ठेवणार आहे, तर त्याची काय दशा होईल?

**दादाश्री :** पण खाटिकाची दशा काय वाईट आहे? खाटिकाने काय गुन्हा केला आहे? खाटिकाला तुम्ही विचारून तर बघा की, 'भाऊ, तू कशाला असा धंदा करतोस?' तेव्हा तो म्हणेल, 'भाऊ, माझे बाप-दादा करत होते, म्हणून मी करतो. माझ्या पोटासाठी, माझ्या मुलांच्या पालन-पोषणासाठी करतो.' आपण विचारू, 'पण तुला हा शौक आहे का?' तेव्हा तो म्हणेल, 'नाही, मला शौक नाही.'

म्हणजे या खाटिकापेक्षा तर मांसाहार खाणाऱ्याला जास्त पाप लागते. बिचाऱ्या खाटिकाचा तर तो धंदाच आहे. त्याला मी ज्ञान देतो. इथे माझ्याजवळ आला असेल तर मी त्याला ज्ञान देतो. त्याने ज्ञान घेतले तरी काही हरकत नाही. भगवंताकडे यास हरकत नाही.

## कबूतर, शुद्ध शाकाहारी

आपल्या इथे हिंदुस्तानात कबुतरखाने असतात पण कावळाखाने ठेवले नाहीत? पोपटखाना, चिमणीखाना असे का ठेवत नाही, आणि फक्त कबुतरखानाच का ठेवतात? काही कारण असेलच ना? कारण फक्त हे कबूतरच व्हेजिटेरियन आहे, नॉनव्हेजला ते शिवतही नाही. तेव्हा आपल्या लोकांना वाटले की, पावसाळ्यात ते बिचारे काय खातील? म्हणून आपल्या इथे कबुतरखाने बनवून तिथे ज्वारीचे दाणे टाकतात. आता जर त्यात सडलेला दाणा असेल तर ते खात नाहीत, कारण त्याच्या आत जीवजंतू आहेत, म्हणून ते खात नाहीत. कबूतर म्हणजे पूर्णपणे अहिंसक! या मनुष्यांनी बाउंड्री सोडली, पण हे कबूतर बाउंड्री सोडत नाही. कबूतर सुद्धा प्यूअर व्हेजिटेरियन आहे. म्हणून संशोधन केले की कबुतराचे ब्लड कसे

असेल? तर खूपच गरम. सर्वात जास्त गरम रक्त कबुतराचे आहे आणि ते खूप समजूतदारही आहे. कारण ते व्हेजिटेरियन, प्यूअर व्हेजिटेरियन आहे.

म्हणजे फक्त मनुष्यच फलाहारी आहेत असे नाही. पण आपल्या गाई, म्हशी, गाढव हे सुद्धा फलाहारीच आहेत. ही काय सामान्य गोष्ट आहे? ही गाढवे खूप उपाशी असतील आणि त्यांना जर मांसाहार खाण्यास दिला तर ते खाणार नाहीत. म्हणून आपल्याला अहंकार करण्यासारखे नाही की, 'आम्ही प्यूअर व्हेजिटेरियन आहोत.' नाही रे बाबा, शुद्ध शाकाहारी तर या गाई म्हशीसुद्धा आहेत, मग यात तू काय नवीन केलेस? हे प्यूअरवाले तर कधीतरी अंडेही खाऊन येतात. पण ते तर कधीच खात नाहीत. 'आम्ही प्यूअर, प्यूअर, प्यूअर', असे बोलण्यासारखे नाही आणि जे मांसाहार करतात त्यांच्यावर टीकाही करण्यासारखी नाही.

## अंडे खाऊ शकतो?

**प्रश्नकर्ता :** कित्येक लोक वाद घालतात की, अंडी दोन प्रकारची असतात, एक जीववाले आणि दुसरे निर्जीव. मग ते खाऊ शकतो की नाही?

**दादाश्री :** फॉरेनमध्ये ते लोक वादविवाद करत होते की, अहिंसक अंडे! म्हणून मी सांगितले, या जगात जीव नसलेले काहीच खाऊ शकत नाही. निर्जिव वस्तू खाऊच शकत नाही. अंड्यात जर जीव नसेल तर ते अंडे खाऊ शकत नाही, कारण ती जड (निर्जीव) वस्तू झाली. ज्यात जीव नसेल ती जड वस्तू झाली. तुम्हाला जर जीवाला खायचे असेल तर त्याला असे कापल्यानंतर ते दोन-तीन दिवसापर्यंतच, नासणार नाही तोपर्यंतच खाता येते. हा भाजीपाला देखील तोडल्यानंतर ठराविक काळापर्यंतच खाऊ शकतो, नंतर तो नासतो. म्हणजेच जिवंत वस्तूच खाऊ शकतो. अंडे जर निर्जीव असेल तर ते खाऊ शकत नाही, सजीव असेल तरच खाऊ शकतो. हे लोक

जर अंड्याला सजीव म्हणत नसतील तर त्या सर्व गोष्टी हम्बग (फालतू) आहेत. मग लोकांना असे का फसवता?

या दुसऱ्या प्रकारच्या अंडयावाल्यांनी त्या अंडयाला जगात कोणत्या रूपात ठेवले हेच आश्चर्य आहे. त्या दुसऱ्या प्रकारच्या अंडेवाल्यांना मी विचारले की, हा दुसऱ्या प्रकारचा जीव सजीव आहे की निर्जीव आहे, ते मला सांगा. निर्जीव असेल तर खाल्ले जाऊ शकत नाही. तुम्ही तर संपूर्ण जगाला मूर्ख बनवले, कसली माणसे आहात तुम्ही? ज्यात जीव नसतो ते आपण खाऊच शकत नाही. ते अखाद्य मानले जाते.

**प्रश्नकर्ता :** पण हे व्हेजिटेरियन अंडे फळत नाही.

**दादाश्री :** ते फळत नाही ही वेगळी गोष्ट आहे. पण ते जिवंत आहे.

म्हणजे हे असे सर्व मनात ठसवून दिले, त्यामुळे या जैनांच्या मुलांना किती त्रास होतो! या गोष्टीवरून तर ती सर्व मुले माझ्याशी भांडली होती. नंतर मी त्यांना समजावले की, 'अहो, तुम्ही थोडा विचार तरी करा. निर्जीव असेल तर हरकतच नाही पण आपण निर्जीव खाऊच शकत नाही.' नंतर सांगितले, 'जर जास्त शहाणपणा करत असाल तर तुम्ही धान्य वगैरे पण खाऊ शकत नाही. मग तुम्ही निर्जीव वस्तूच खा.' आणि निर्जीव वस्तू तर शरीराला उपयोगी पडत नाही. त्यात विटामिन नसतात. निर्जीव वस्तू शरीराची भूक तर मिटवतात, पण त्यात विटामिन नसते. म्हणून शरीर जगत नाही. हवे ते विटामिन मिळत नाहीत ना! निर्जीव वस्तू तर चालतच नाही. तेव्हा त्या मुलांनी स्वीकारले की आजपासून आम्ही अंडे खाणार नाही. समजावले तर लोक समजण्यास तयार आहेत. नाही तर हे लोक तर मनात असे ठसवून देतात त्यामुळे मग बुद्धी फिरते.

हे जे आपण गहू, तांदूळ वगैरे खातो, लांबलचक दुधी खातो, ते सर्व जीवच आहेत ना! जीव नाहीत का? पण भगवंताने खाण्याची

बाउंड्री दिली आहे की हे जीव तुम्ही खाऊ शकता. पण ज्या जीवांना तुमच्यामुळे त्रास होत असेल अशा जीवांना मारू नका, त्यांना खाऊ नका, त्यांना काहीच करू नका.

**प्रश्नकर्ता :** या अंड्यांना तर त्रास होत नाही, मग ती खाणे चांगले आहे की नाही?

**दादाश्री :** अंड्यांना त्रास होत नाही. पण अंड्यात जो जीव आहे तो बेशुद्धावस्थेत आहे. पण ते फुटते तेव्हा तरी आपल्याला समजते की नाही?

**प्रश्नकर्ता :** लगेच समजते. पण अंडे तर मागेपुढे होत नाही ना! मग?

**दादाश्री :** ते होत नाही. कारण ते बेशुद्धावस्थेत आहे. म्हणून होत नाही. हा मनुष्याचाही गर्भ चार-पाच महिन्यांचा असतो तोपर्यंत तोही अंड्यासारखाच असतो. म्हणून त्यास मारू नये. त्यामधून फुटते तेव्हा काय होते ते आपण समजू शकतो.

## दूध घेऊ शकतो का?

**प्रश्नकर्ता :** ज्याप्रमाणे व्हेजिटेरियन अंडे खाऊ शकत नाही त्याप्रमाणे गाईचे दूध सुद्धा पिऊ शकत नाही का?

**दादाश्री :** अंडे खाऊ शकत नाही. पण गाईचे दूध आपण खुशाल पिऊ शकतो. गाईच्या दुधाचे दही पण खाऊ शकतो, काही माणसे लोणी पण खाऊ शकतात. नाही खाऊ शकत असे नाही.

देवाने लोणी खाण्यास नाही का सांगितले? ती वेगळी गोष्ट आहे. तेही ठराविक माणसांसाठीच खाऊ नये असे सांगितले आहे. गाईच्या दुधाची खीर करून खुशाल खाऊ शकता. त्याची बासुंदी केली तरीही हरकत नाही. एखाद्या शास्त्रांनी मनाई केली असेल तरी मी तुम्हाला सांगेन की जा, काही हरकत नाही. ते शास्त्र चुकीचे

आहे. तरीही असे सांगितले आहे की जास्त खाशील तर त्रास होईल. तेवढेच तुम्ही सांभाळायचे, लिमिटमध्येच खायचे.

**प्रश्नकर्ता :** पण दूध तर निसर्गाने वासरासाठी दिले आहे. आपल्यासाठी दिले नाही.

**दादाश्री :** ही चुकीची गोष्ट आहे. हे तर जंगली गाई आणि जंगली म्हशी होत्या ना, त्यांची वासरे सर्व दूध पिऊन टाकीत. आणि आपल्या इथे तर आपले लोक गाईला चांगले खाऊ घालून पोषण करतात. म्हणजे वासराला पण पाजायचे आणि आपण सर्वांनीसुद्धा प्यायचे. आणि आदी-अनादिपासून हा व्यवहार चालत आला आहे. गाईला चांगल्या प्रकारे पोषण दिले तर गाई १५-१५ लिटर दूध देते. कारण तिला चांगले खाऊ-पिऊ घातले तर नॉर्मल दुधाच्या मानाने ती खूप जास्त दूध देते. आणि दूध इतकेच घ्यायचे की वासरू उपाशी राहणार नाही.

चक्रवर्ती राजा तर हजार-हजार, दोन-दोन हजार गाई ठेवत असत. त्यास गोशाळा म्हणत होते. चक्रवर्ती राजे दूध कसे पित असतील? गोशाळेत हजार गाई असतील, तर त्या हजार गाईंचे दूध काढायचे आणि ते दूध शंभर गाईंना पाजायचे, त्या शंभर गाईंचे दूध काढायचे आणि ते दहा गाईंना पाजायचे. आणि त्या दहा गाईंचे दूध काढायचे आणि ते एका गाईला पाजायचे आणि त्या एका गाईचे दूध चक्रवर्ती राजे पीत असत.

## हिंसक प्राण्याची हिंसेत हिंसा?

**प्रश्नकर्ता :** कोणत्याही प्राण्याला मारणे ही हिंसा आहे. परंतु हिंसक प्राणी की जे इतर प्राण्यांना किंवा मनुष्यांना इजा पोहोचवतात किंवा जीवहानी करू शकतात, तर त्यांची हिंसा करायची की नाही?

**दादाश्री :** कोणाचीही हिंसा करायची नाही असा भाव ठेवावा. आणि तुम्ही सापाला मारले नाही तर दुसरा कोणीतरी मारणारा भेटेल.

म्हणजे तुमच्यात साप मारण्याची शक्ती नसेल तर इथे त्यांना मारणारे खूप आहेत, भरपूर आहेत आणि त्यांना मारणाऱ्या अन्य जाती पण पुष्कळ आहेत. म्हणून तुम्ही तुमचा स्वभाव बिघडवू नका. हिंसा करण्यात काही फायदा नाही. हिंसा तर स्वत:चेच नुकसान करते.

## जीवो जीवस्य जीवनम्

**प्रश्नकर्ता :** मनुष्य बुद्धीजीवी प्राणी आहे म्हणून त्याने पशुहिंसा करायची नसते. परंतु एक प्राणी दुसऱ्या प्राण्याला खाऊन जगू शकत असेल तर ते मानव आणि प्राणी यांच्यातील बुद्धीच्या फरकामुळे असा भेदभाव आहे का? प्राण्या प्राण्यांमधील हिंसेचे काय?

**दादाश्री :** प्राण्या-प्राण्यांमधील हिंसेत 'यु आर नॉट रिस्पोन्सिबल ॲट ऑल.' कारण या समुद्राच्या आत काही शेते नसतात किंवा रेशनची दुकानेही नसतात. म्हणून तिथे हिंसा चालूच राहते. मोठे तोंड उघडून मोठे मासे बसलेले असतात, आणि लहान मासे तर त्यांच्या पोटातच शिरतात. नंतर तोंड बंद केले म्हणजे सर्व खलास! पण तुम्ही त्यासाठी जबाबदार नाही. हा तर जगाचा नियमच आहे. आपण मनाई करतो आणि ते सर्व बकऱ्यांना खाऊन टाकतात. मोठे जीव लहान जीवाला खातात, लहान जीव त्याच्याहीपेक्षा लहान जीवाला खातो. त्याहून लहान त्याहून लहानाला खातो. असे करत-करत संपूर्ण समुद्राचे जग चालत आहे. जोपर्यंत मनुष्य जन्माचा विवेक येत नाही तोपर्यंत सगळी सूट आहे. आता तिथे तर कोणी वाचवायला जात नाही आणि आपल्या इथे लोक वाचवण्यासाठी जातात.

## संपूर्ण अहिंसकाला नाही कसली आंच

**प्रश्नकर्ता :** परंतु हे अहिंसक माणसावर गोळीबार करतात.

**दादाश्री :** अहिंसक माणसांवर गोळीबार होतही नाही. कोणाला गोळीबार करायचा असेल तरी होणार नाही. जो अहिंसक आहे ना, त्याला शंभर बाजूंनी गोळ्या मारण्यास सुरुवात केली तरीही त्याला

गोळी शिवणार नाही. हे तर हिंसकांनाच गोळी लागते. प्रत्येक वस्तूचा स्वभाव आहे.

आत्ताच्या काळात फक्त अहिंसाच पाळण्यात आली तर या संसारात लोक लुटून घेतील. थोडया वेळेसाठी जर सूट देण्यात आली ना, तर इथे बसूही देणार नाहीत. कारण कलियुग असल्यामुळे लोकांची मने बिघडून गेलेली आहेत. अनेक प्रकारचे व्यसनी होऊन गेले आहेत. म्हणून वाटेल ते करतील. म्हणजे एका बाजूला गोळ्या असतील तर दुसऱ्या बाजूला अहिंसा टिकू शकेल, नाही तर बळजबरीने अहिंसा पाळून घ्यावी लागेल.

पण तरी आता हा काळ याला बदलवत आहे! काळ या सर्व गोष्टी बदलवत आहे, तेव्हा आता तुम्ही खूप चांगला काळ बघाल. तुम्ही स्वतःच हे सर्व बघाल.

**प्रश्नकर्ता :** एक संत अहिंसा पाळत होते तरीही त्यांचा खून का झाला? कारण आताच तुम्ही सांगितले की जो अहिंसा पाळतो त्याच्यावर गोळीबार होत नाही.

**दादाश्री :** अहिंसा कशास म्हणतात? की कोणाच्याही कोणत्याही बाबतीत हस्तक्षेप करत नाही, त्याला म्हणतात अहिंसक. एकाला सांगतील की यांना जास्त द्या. कारण ते नाठाळ आहेत. भले ते नाठाळ असतील, तरीही त्यांना जास्त द्या. असे म्हटले, की दुसऱ्या पक्षाला वाईट वाटते. त्यामुळे ते रुसतात. म्हणून ही हिंसा म्हटली जाते. यात पडूच नये. असा न्याय करूच नये. जो अहिंसक असेल तो न्याय करतच नाही. न्याय करतात तिथे हिंसा आहे.

बाकी, जर तुम्ही संपूर्ण अहिंसा पाळत असाल तर तुमच्यावर कोणीही गोळी झाडू शकत नाही. आता संपूर्ण अहिंसा म्हणजे काय? तर एकसुद्धा पक्षपाती शब्द तोंडाने बोलू नये. आणि बोलाल तर अमुकच शब्द बोलू शकता. दुसरे शब्द बोलू नये. कोणत्याही दोन पार्टीमध्ये पडू नये. दोन पार्टीत पडले तर एकाची थोडी-फार हिंसा होतेच!

## जीवांचा बळी

**प्रश्नकर्ता :** कित्येक मंदिरात जीवांचा बळी देतात, ते पाप आहे की पुण्य आहे?

**दादाश्री :** त्या बळी देणाऱ्याला आपण विचारले की तू यात काय मानतो? तेव्हा तो म्हणेल, मी पुण्य करत आहे. बोकडाला विचारले की तुझे काय मत आहे? तेव्हा तो म्हणेल हा खूनी माणूस आहे. त्या देवाला विचारले तर म्हणेल, 'तो देत असेल तर आम्ही नाही म्हणू शकत नाही. मी तर काही घेत नाही. हे लोक (देवाच्या) पायाला स्पर्श करवून घेऊन जातात.' म्हणजे यात पाप-पुण्याची गोष्ट तर करूच नका. बाकी, हे जे काही करता ती तर सर्व तुमचीच जोखीमदारी आहे. तेव्हा समजून करा. मग तुम्ही काहीही अर्पण करा, तुम्हाला नाही कोण म्हणतो? पण अर्पण करतेवेळी लक्षात ठेवा की होल ॲन्ड सोल रिस्पॉन्सिबिलिटी तुमचीच आहे, दुसऱ्या कोणाची नाहीच.

## अहिंसेचे अनुमोदन, भावना-प्रार्थनेने

आता या मुक्या प्राण्यांची हिंसा करू नये. गौहत्या करू नये. अशी भावना आपण विकसित करावी आणि आपले अभिप्राय इतरांनाही समजावून सांगावे. आपल्याकडून जितके शक्य असेल तितके करावे. त्यासाठी इतरांशी भांडायची गरजच नाही. कोणी म्हणेल, 'आमच्या धर्मात म्हटले आहे की आम्ही मांसाहार करावा.' आणि आपल्या धर्माने मनाई केली असेल म्हणून आपण त्यांच्याशी भांडायची गरज नाही. आपण आपली भावना विकसित करून तयार ठेवावी, मग जे भावनेत असेल ती संस्कृती चालेल.

आणि विश्व समष्टिचे कल्याण करण्याची भावना तर तुम्हाला रात्रंदिवस होत असते ना?! हो, मग त्यानुसार राहिले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** त्या बाबतीत आपण प्रार्थना तर करू शकतो ना?

**दादाश्री :** हो, हो. प्रार्थना करावी, अशी भावना करावी, त्याचे अनुमोदन करावे. एखादा मनुष्य जर समजत नसेल तर आपण त्याला समजवावे. आजकालच ही हिंसा होत आहे असे नाही, हे तर पूर्वीपासूनच चालू आहे. हे जग एका रंगाचे (मताचे) नाही.

महान संत तुलसीदास होते ना, त्यांनी कबीरसाहेबांची खूप ख्याती ऐकली होती. त्यांची महान संत म्हणून कीर्ति पसरलेली होती. म्हणून तुलसीदासांनी ठरवले की, मला त्यांचे दर्शन घेण्यास गेले पाहिजे. मग तुलसीदास तिथून दिल्लीला आले. तिथे कोणाला तरी विचारले की 'भाऊ, कबीरसाहेबांचे घर कुठे आहे?' तेव्हा तो म्हणाला, 'कबीरसाहेब म्हणजे जे वीणकर आहेत त्यांचे बाबत विचारत आहात का?' तर तो म्हणाला, 'हो.' त्यावर तो म्हणाला 'ती तिथे झोपडी बांधलेली आहे, तिथून खाटिकवाड्याकडून जा.' तुलसीदास तर ब्राम्हण, शुद्ध माणूस, ते खाटिकवाड्यात शिरले. रस्त्याच्या एका बाजूला बकरे टांगलेले होते तर एका बाजूला कोंबड्या टांगलेल्या होत्या. ते तर संकटात सापडले. ते या बाजूला असे बघत जायचे आणि थुंकत जायचे. असे करत-करत ते कबीरसाहेबांच्या घरापर्यंत पोहोचले. तर त्रास तर होणारच ना? अशा गोष्टी तुलसीदासांनी प्रॅक्टिसमध्ये आणल्या नव्हत्या. कारण नेहमीच प्रत्येक गोष्ट प्रॅक्टिसमध्ये आणली पाहिजे. म्हणजे ही अशी फसगत झाली. मग तुलसीदास तिथे जाऊन घरात बसले. तेव्हा तिथे एक-दोन भक्त बसले होते त्यांनी तुलसीदासांना सांगितले की बसा साहेब, कबीरसाहेब आत स्वयंपाकघरात गेले आहेत. मग त्यांना खाटेवर बसण्यास सांगितले. नंतर कबीरसाहेब आले. ते म्हणाले, चला, 'आपण सत्संग करू या.' पण तुलसीदासांच्या मनात जे होते ते त्यांनी कबीरसाहेबांना पटकन बोलून दाखवले की, 'तुम्ही एवढे मोठे संत, संपूर्ण हिंदुस्तानात तुमची कीर्ती आहे. मग तुम्ही या खाटिकवाड्यात का राहता?' कबीरसाहेब तर हजरजबाबी, त्यांना दोहा तयार करावा लागत नसे. ते बोलतील तोच दोहा. ते तर लगेच म्हणाले, *'कबीर का घर बाजार में, गलकटियों*

*के पास। करेगा सो पायेगा तु क्युं होवे उदास।'* (म्हणजे - कबीराचे घर गळे कापणाऱ्या खाटिकांच्या घराजवळ आहे. ते काम (गळे कापण्याचे) जो करील, तो त्याचे फळ भोगील तू कशाला उदास होतोस?) हे ऐकून तुलसीदास समजून गेले की माझी सर्व भक्ती धुळीस मिळवली. माझी अब्रूच काढली.

तर अशी अब्रू जाणार नाही असे वागावे. आपली भावना चांगली ठेवावी. फक्त या काळातच नव्हे, हे तर अनादि काळापासूनच असेच चालत आलेले आहे. रामचंद्रजींचे नोकर सुद्धा मांसाहार करत होते. कारण क्षत्रिय मांसाहार केल्याशिवाय राहतात का?

आपली भावना चांगली ठेवावी. त्या लोकांच्या भानगडीत पडूच नये. कारण ते लोक नासमजुतीमुळे भांडण उभे करतात. यामुळे काही फायदा तर होत नाही वर नुकसानच होते. याला काय अर्थ? ते केव्हा शक्य असते? की जर आपलाच राजा असेल आणि त्याने अधिकार गाजवला की, 'हे भाऊ, काही ठराविक दिवसात तुम्ही असे (मांसाहार) करू नका.' परंतु आत्ता तर आपल्या हातात सत्ता नाही मग असा शहाणपणा करायला कोणी सांगितले? तुम्ही तुमचे काम करा ना! देवाच्या घरी कोणी मरतच नाही. तुम्ही तुमचे (मोक्षाचे) काम करून घ्या आणि अहिंसेला अनुमोदन द्या. कोणतीही वाईट भावना बाळगू नका.

## सर्वात मोठा अहिंसक कोण?

परंतु हे जीव वाचवण्यापेक्षा एकच भाव करायचा की कोणत्याही जीवाला आपल्याकडून किंचितमात्र पण दुःख न होवो. मनानेही दुःख न होवो, वाणीनेही दुःख न होवो आणि वर्तनानेही दुःख न होवो! बस, मग यासारखा मोठा अहिंसक कोणीच नाही. असा भाव असेल, इतकी जागृती असूनही जर देहाने जीवजंतू मारले गेले, ते मग 'व्यवस्थित!' आणि नवीन वाचवण्याच्या गोष्टी बोलायच्याच नाहीत.

## अभयदान कोणत्या जीवांसाठी?

**प्रश्नकर्ता :** मी असे सांगत आहे की जीवांना अभयदान मिळावे म्हणून दहा वर्षांपूर्वीच आम्ही कंदमूळ न खाण्याची प्रतिज्ञा केली होती.

**दादाश्री :** अभयदान तर, जो जीव हालू-चालू शकत असेल, जो जीव घाबरत असेल, भीतीचा अनुभव करू शकत असेल, अशा जीवाला अभयदान द्यायचे आहे. ज्यांना भय समजतच नाही त्यांना अभयदान कसे काय देणार?

अभयदान म्हणजे ज्या जीवांना भीती वाटत असेल, उदा. लहान मुंगीलासुद्धा आपण हात लावला तर तिला भीती वाटते, त्यांना अभयदान द्या. पण हे गव्हाचे दाणे, बाजरीचे दाणे यांना भीती वाटत नाही. त्यांना काय निर्भय करायचे? भय समजतच नाही, मग त्यांना अभयदान कसे द्यायचे?

**प्रश्नकर्ता :** एकदम करेक्ट आहे.

**दादाश्री :** म्हणजे हे सर्व समजल्याशिवायच चालले आहे. जे चोपडायचे (औषध) आहे ते पिऊन टाकतात आणि नंतर म्हणतील, 'महावीर भगवंतांचे औषध प्याला आणि मरून गेला!' 'अरे, महावीर भगवंतांना कशाला बदनाम करतोस?' परंतु आता तर हाच व्यापार चालू आहे. चोपडण्याचे औषध पितात आणि मग म्हणतील, धर्म खोटा आहे. अरे मूर्खा, धर्म खोटा असतो का कधी? पूर्वी काय तू चोपडण्याचे औषध पीत होतास?

**प्रश्नकर्ता :** यापूर्वी तर काही माहीतच नव्हते.

**दादाश्री :** हे चोपडायचे आहे की प्यायचे आहे तेच माहीत नव्हते! ज्या जीवांना भय वाटते त्यांना त्रसकाय जीव म्हणतात. म्हणून ही भयसंज्ञा उत्पन्न झाली आहे त्यांच्यासाठी भगवंताने सांगितले. दुसऱ्यांसाठी तर असेच सांगितले आहे की, विनाकारण पाणी सांडू

नका. अंघोळ करा, प्या, धुवा, कपडे धुवा. परंतु अनर्थ म्हणजे काही हेतू नसेल तर विनाकारण सांडासांडी करू नका.

## अभयदान हे महादान

**प्रश्नकर्ता :** मग जैन धर्मात अभयदानाला एवढे महत्त्व का दिले गेले?

**दादाश्री :** अभयदानाला तर सर्वांनीच महत्त्व दिले आहे. अभयदान तर मुख्य आहे. अभयदान म्हणजे काय की इथे चिमण्या बसल्या असतील तर आपल्या भीतीने त्या उडून जाऊ नयेत म्हणून आपण हळूच दुसऱ्या बाजूने निघून जावे. रात्री बाराच्या सुमारास आपण बाहेरून आलो असू आणि रस्त्यात दोन कुत्रे झोपलेले असतील तर ते आपल्या बुटाच्या आवाजाने घाबरून जागे होतील, असे समजून पायातून बूट काढून हळूहळू, आवाज न करता घरात येणे. आपल्यामुळे कोणी घाबरेल त्यास मानवता कसे म्हणता येईल? बाहेर कुत्रे पण आपल्याकडून भयभीत व्हायला नकोत. आपण बुटाने पाय वाजवत-वाजवत आलो आणि कुत्रे असे कान टवकारून उभे राहिले, तर आपण समजावे की ओहोहो, आपण अभयदान चुकलो! अभयदान म्हणजे कोणत्याही जीवाला आपल्याकडून भय वाटता कामा नये. कुठे पाहिले आहेत का अभयदानी पुरुष? अभयदान तर सर्वात मोठे दान आहे.

मी बावीस वर्षांचा होतो तेव्हाही कुत्र्यांना माझ्याकडून भय वाटू देत नव्हतो. आम्ही निरंतर अभयदानच देत असतो, दुसरे काही देत नाही. जर कोणी आमच्यासारखे अभयदान द्यायला शिकला तर त्याचे कल्याण होऊन जाईल! भयाचे दान देण्याची तर लोकांना पूर्वीपासून प्रॅक्टिस आहे, नाही का? 'मी तुला बघून घेईन' असे म्हणतील. मग यास अभयदान म्हटले जाईल की भयाचे दान म्हटले जाईल?

**प्रश्नकर्ता :** मग आपण जीवांना वाचवतो ते अभयदान नाही का?

**दादाश्री :** यात तर वाचवणाऱ्याचा जबरदस्त गुन्हा आहे. तो फक्त अहंकारच करतो. भगवंताने तर इतकेच म्हटले होते की तुम्ही तुमच्या आत्म्याची दया पाळा. बस, संपूर्ण शास्त्रात इतकेच म्हटले आहे की भावदया पाळा. दुसऱ्या कुठल्या दयेसाठी तुम्हाला सांगितलेले नाही. आणि विनाकारण काही हातात घ्याल तर तो गुन्हा होईल.

## तो आहे वाचवण्याचा अहंकार

हे तर सगळे असेच समजतात की, आपण वाचवतो म्हणून हे जीवजंतू वाचतात. आपले लोक तर कसे आहेत? घरी आईला शिव्या देतात आणि बाहेर वाचवण्यासाठी निघालेले असतात!

या लोकांना समुद्रात पाठवायला पाहिजे. समुद्रात तर भाजीपाला, धान्य वगैरे सर्व उगवतच असेल, नाही का? मासे तेच खात असतील ना? किंवा मग आपण इथून धान्य पाठवत असू, नाही का? का? फुटाणे वगैरे टाकून खाऊ घालत नाही? मग त्यांचा आहार काय असेल? एवढे-एवढे, लहान-लहान मासे असतात, त्यांना मोठे मासे गिळून टाकतात. मोठया माशांना पुन्हा त्यांच्यापेक्षा मोठे मासे गिळतात. असे निरंतर एकमेकांना गिळतच राहतात. आणि एका बाजूने नवीन माल तयार होतच राहतो! आता जर तिथे अक्कलवाल्याला बसवले तर त्याची काय अवस्था होईल?

जगात कशी मान्यता चालत आहे? 'आम्ही वाचवत आहोत' असे म्हणतात, आणि खाटिकावर द्वेष करतात. त्या खाटिकाला आपण विचारले की, 'तू असा नालायक धंदा करतोस?' तेव्हा तो म्हणेल, 'का साहेब, माझ्या धंद्याला तुम्ही नालायक का म्हणता? माझा धंदा तर बाप-दादांच्या पिढ्यांपासून चालत आलेला आहे. ही तर आमची परंपरा आहे.' तो मग आपल्याला असे म्हणेल. म्हणजे ही त्यांची वंश परंपरा म्हटली जाईल. आपण त्याला काही सांगायला गेलो तर त्याला असे वाटेल की 'ही बेअक्कल माणसे यांना काही समजतच नाही.'

म्हणजे जे मांसाहार खातात ते असा अहंकार करत नाहीत की 'आम्ही मारू आणि आम्ही असे करू.' उलट अहिंसावालेच खूप अहंकार करतात की, 'मी वाचवतो.' अरे, वाचवणारे आहात तर घरी नव्वद वर्षाचे म्हातारे वडील आहेत, जे मरणोन्मुख अवस्थेत आहेत. त्यांना वाचव ना! पण असे कोणी वाचवतो का?

**प्रश्नकर्ता :** कोणीच वाचवत नाही.

**दादाश्री :** मग असे का बोलतोस की मी वाचवले आणि मी असे केले?! खाटिकाच्या हातातही सत्ता नाही. मारण्याची सत्ता असलेला कोणी जन्माला आलेलाच नाही. हा तर बिनकामाचा अहंकार करतो. हा खाटिक म्हणतो, 'मी मोठमोठे जीव कापले.' तो त्याचा अहंकार करतो, तेव्हा रियल काय म्हणते?! या मारणाऱ्याचा मोक्ष होईल की त्या वाचवणाऱ्याचा मोक्ष होईल? दोघांचाही मोक्ष होणार नाही. दोघेही अहंकारी आहेत. हा वाचवण्याचा अहंकार करतो, आणि तो मारण्याचा अहंकार करतो. रियलमध्ये असे चालत नाही, रिलेटिव्हमध्ये चालते.

## ते दोघेही अहंकारी आहेत

भगवंत काही कच्ची माया नाही. भगवंतांकडे तर मोक्षाला जाण्यासाठी कोणता कायदा आहे? एक दारू पिण्याचा अहंकार करतो आणि दुसरा दारू न पिण्याचा अहंकार करतो. त्या दोघांना भगवंत मोक्षात प्रवेश करू देत नाहीत. तिथे नशा (अहंकार) करणाऱ्याला प्रवेश करू देत नाहीत. तिथे नशा न करणाऱ्याला प्रवेश करू देतात.

म्हणजे जे लोक दारू पीत नाहीत त्यांनी मनात खोटी घमेंड बाळगणे हा भयंकर गुन्हा आहे. ते तर दारू पिणाऱ्यापेक्षाही वाईट आहे. दारू पीत असेल तो तर बिचारा असेच सांगेल की, 'साहेब, मी तर अगदीच मूर्ख मनुष्य आहे, गाढव आहे, नालायक आहे.' आणि त्याच्यावर दोन मडकी पाणी टाकले की त्याची नशा उतरते.

पण या लोकांना मोहाची जी नशा चढली आहे, ती अनादि जन्मांपासून उतरतच नाही आणि 'मी काही तरी (विशेष) आहे, मी काही तरी आहे' असे करत राहतात.

याचे मी तुम्हाला एक उदाहरण देऊन समजावतो. एका छोट्याशा गावात एक जैन शेठ राहत होते. परिस्थिती साधारण होती. त्याला एक मुलगा तीन वर्षाचा आणि दुसरा मुलगा दीड वर्षाचा होता. अचानक प्लेगची साथ आली आणि आई-वडील दोघे मरून गेले. दोन्ही मुले जिवंत राहिली. नंतर गावकऱ्यांना कळल्यावर ते सर्व एकत्र जमले की 'आता या मुलांचे काय करावे?' आपण यावर काही तरी मार्ग काढू. मुलांसाठी कोणी पालक भेटला तर बरे होईल. एक सोनार होता, त्याने मोठया मुलाला सांभाळण्याची जवाबदारी घेतली. पण त्या दुसऱ्या मुलाला न्यायला कोणी तयार होत नव्हता. मग एक खालच्या (शुद्र) जातीचा मनुष्य म्हणाला, 'साहेब, मी पालक बनू का?' तेव्हा लोक म्हणाले, 'अरे, हा जैन शेठचा मुलगा आणि तू तर खालच्या जातीचा.' पण दुसरे लोक म्हणाले, 'त्याने नाही घेतले तर याला कुठे ठेवाल? मरून जाईल त्यापेक्षा जिवंत तर राहील. मग त्यात काय चुकीचे आहे?' तर अशी ती दोन्ही मुले मोठी झाली. मोठा सोनाराकडे वाढला. तो वीस-बावीस वर्षाचा झाला तेव्हा म्हणू लागला, 'दारू पिणे हा गुन्हा आहे, मांसाहार करणे हा पण गुन्हा आहे.' आणि लहान मुलगा जेव्हा अठरा-वीस वर्षाचा झाला तेव्हा तो म्हणू लागला, 'दारू प्यायला पाहिजे, दारू बनवली पाहिजे, मांसाहार केला पाहिजे.' आता हे दोन्ही भाऊ एकाच भेंडीचे दोन दाणे, मग असे वेगवेगळे का म्हणाले?

**प्रश्नकर्ता :** संस्कार.

**दादाश्री :** हो, संस्कार, वेगवेगळ्या पाण्याचे सिंचन झाले! म्हणून मग कोणी म्हटले, 'याला तर जैन म्हणताच येणार नाही ना!' एक संत होते, त्यांना विचारले की, 'साहेब, हे दोघे भाऊ आहेत आणि दोघेही असे वेगळे-वेगळे सांगतात. यात कोणाचा मोक्ष होईल?'

तेव्हा संत म्हणाले, 'यात मोक्षाची गोष्ट करण्याचा संबंधच कुठे येतो? एक दारू न पिण्याचा अहंकार करत आहे, मांसाहार न खाण्याचा अहंकार करत आहे, आणि दुसरा दारू पिण्याचा अहंकार करत आहे, मांसाहार खाण्याचा अहंकार करत आहे. यात मोक्षाची गोष्टच कुठे आहे? मोक्षाची गोष्ट तर वेगळीच आहे. तिथे तर निरअहंकारी भाव पाहिजे.' आणि हे तर दोघेही अहंकारी आहेत. एक या खड्ड्यात पडला आहे दुसरा त्या खड्ड्यात पडला आहे. देव तर दोघांना अहंकारी म्हणतात.

## फक्त अहिंसेच्या पुजाऱ्यांसाठीच

लोक जे मानतात तसे भगवंतांनी सांगितलेले नाही. भगवंत, खूप समंजस पुरुष! भगवंतांने असे सांगितले की, या जगात असा कोणीही नाही की जो कोणाला मारू शकेल. कारण सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्स आहेत. मग कसे मारू शकेल? कितीतरी संयोग एकत्र येतात तेव्हा तो मरतो! आणि त्याचबरोबर असेही सांगितले की, ही पूर्णपणे गुप्त ठेवण्यासारखी गोष्ट आहे. तेव्हा कोणी म्हणेल, 'साहेब, तुम्ही असेही सांगता आणि तसेही सांगता?' तेव्हा भगवंत म्हणतात, 'हे पाहा, ही गोष्ट शहाण्या माणसांसाठी आहे, जे अहिंसेचे पुजारी आहेत त्यांच्यासाठी हे वाक्य सांगत आहोत. आणि जे हिंसेचे पुजारी आहेत त्यांच्यासाठी हे सांगत नाही. नाही तर ते भावना करतील की मला यांना मारून टाकायचे आहे. म्हणजे या जन्मात तर असे होणार नाही पण अशी भावना केल्यामुळे पुढील जन्मात त्याचे फळ येईल.' तेव्हा ही गोष्ट कोणाजवळ बोलायची आहे? तर या अहिंसेच्या पुजाऱ्यांजवळ ही गोष्ट बोलण्यास सांगितले आहे.

## 'हे' सर्वांसाठी नाही

भगवंताने सांगितले की मारण्याचा अहंकार करू नकोस, आणि वाचवण्याचा अहंकारही करू नकोस. तू मारशील तर तुझा आत्मभाव मरेल, बाहेर कोणी मरणार नाही. म्हणजे ही स्वतःचीच हिंसा होत

आहे. दुसरे काही नाही. आत्मा काही असा मरत नाही, पण हा तर स्वत: स्वत:चीच हिंसा करत आहे. या कारणाने भगवंतांनी मनाई केली आहे. आणि तू वाचवशील तर तू खोटा अहंकार करत आहेस. तीसुद्धा तू आत्मभावाची हिंसाच करत आहेस. म्हणजे हे दोघेही चुकीचे करतात. तेव्हा सोड ना ही भानगड! खरे तर कोणी कोणाला मारू शकतच नाही. पण देवाने जर असे स्पष्ट सांगितले असते की मारू शकतच नाही, तर लोकांनी अहंकार केला असता की मी मारले! अशी कोणातही शक्ती नाही. बिनशक्तीचे हे जग आहे. उगाच विकल्प करून भटकतच राहतात. ज्ञानींनी हे पाहिले आहे की, हे जग कशाप्रकारे चालत आहे. म्हणजे हे सर्व चुकीचे विकल्प घुसले आहेत, तिथे मग निर्विकल्प कसे होऊ शकतील?

हे जे सर्व जीव आहेत ना, ते कोणी कोणाला मारू शकतच नाहीत. मारण्याची शक्ती कोणातही नाही. तरीसुद्धा भगवंताने सांगितले की हिंसेला सोडून अहिंसेच्या मार्गावर या. ते काय म्हणतात की मारण्याचा अहंकार सोडा. दुसरे काही सोडायचे नाही, मारण्याचा अहंकार सोडायचा आहे. तुम्ही मारल्याने कोणी मरत नाही, मग उगाच अहंकार कशाला करता? अहंकार केल्याने तर उलट जाळयात जास्त फसाल, भयंकर जोखीम ओढवून घ्याल. त्या जीवाला त्याच्या निमित्ताने मरू द्या ना! तो मरणारच आहे, मग तुम्ही कशाला अहंकार करता? अर्थात अहंकार बंद करण्यासाठी देवाने अहिंसेची प्रेरणा दिली. मारण्याचा जो अहंकार आहे तो सोडवण्यासाठी हे सर्व सांगितले.

**प्रश्नकर्ता :** इतके ज्ञान पचवणे हे सामान्य माणसासाठी जरा अवघडच आहे नाही का?

**दादाश्री :** नाही, ते पचेल असे नाही. म्हणून तर उघड केले नाही. सगळ्यांना असेच सांगितले की तुम्ही वाचवा. नाही तर ते मरतील.

## मारण्या-वाचवण्याचे गुप्त रहस्य

आता 'याने जीव मारला, याने असे केले, याने वाचवले' हे

सर्व व्यवहार मात्र आहे. हे करेक्ट नाही. आणि रियलमध्ये काय आहे? कोणताही जीव कोणत्याही जीवाला मारू शकतच नाही. मारण्यासाठी तर सर्व सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस् एकत्र येतात तेव्हाच तो मरतो. कुणी एकटा मनुष्य स्वतंत्रपणे असे मारू शकत नाही. आता जर एविडन्सेस् एकत्र आले तरच मरेल, आणि एविडन्सेस् तर आपल्या हातात नाहीत. म्हणून कोणताही जीव कोणत्याही जीवाला वाचवू शकतच नाही. जर सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस् असतील तरच वाचेल. नाही तर वाचणार नाही. हा तर फक्त वाचवण्याचा अहंकार करतो. पण त्याचबरोबर असेही सांगितले की मला मारायचे आहे असा भाव तू मनातून काढून टाक. कारण भाव एक एविडन्स आहे. म्हणून हा एविडन्स आणि दुसरे एविडन्सेस् एकत्र आले तर कार्य होऊन जाईल. म्हणजे त्यातील 'वन ऑफ द एविडन्सेस्' 'स्वतःचा' भाव आहे. त्यामुळे सगळ्याच एविडन्सेसचा 'स्वतः' अहंकार करतो.

## मरणकाळीच मरण

हे तर आम्ही अति सूक्ष्म गोष्ट सांगू इच्छितो की कोणत्याही जीवाला त्याचा मरणकाळ आल्याशिवाय कोणी मारू शकत नाही. समजा आता सात बोकड असतील, तर त्यातील तो दोन बोकड विकतो, ज्यांचा मरणकाळ आलेला असतो तेच दोन तो विकतो. अरे, त्या सातातून हे दोन तुला प्रिय नव्हते? ते पण चांगलेच आहेत बिचारे, मग तू त्यांना का विकतोस? आणि बोकडसुद्धा खुश होऊन त्याच्यासोबत जातात. कारण मरणकाळ जवळ आला म्हणून! मग त्याला तिथे खाटिकखान्यात रंगवतात-सजवतात, तेव्हा तो खुश होतो. त्याला वाटते दिवाळीच आली. असे हे जग आहे. पण हे सर्व समजण्यासारखे आहे.

अर्थात कोणाचा मरणकाळ आल्याशिवाय बाहेर कोणी मरत नाही. पण तू मारण्याचा भाव केला म्हणून तुला भावहिंसा लागते. आणि ती तुझ्या आत्म्याचीच हिंसा होत राहिली आहे. तू तुझी

स्वत:चीच हिंसा करीत आहेस. बाहेरचा तर तो जेव्हा मरणार असेल तेव्हा मरेल. त्याची वेळ येईल, त्याचा योग जुळून येईल आणि ते तर सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडन्सेस् आहेत. कितीतरी संयोग एकत्र येतात आणि ते डोळ्यांनी दिसतही नाहीत असे एविडन्सेस् एकत्र येतात तेव्हा तो जीव मरतो. आणि त्याला वाटते, 'मी त्याला मारले' 'अरे, तुझी मारण्याची इच्छा तर नाही मग तू त्याला कसे मारले?' तेव्हा म्हणतो, 'पण माझा पाय त्याच्यावर पडला ना!' 'अरे, तुझा पाय? तुझ्या पायाला लकवा होणार नाही?' तेव्हा म्हणतो, 'पक्षाघात तर पायाला होतो.' तर मग तो पाय तुझा नाही. तुझ्या वस्तूला लकवा होत नाही. तू तुझ्या पायावर मालकीपणा दाखवतोस पण ती चुकीची मालकी आहे. कोणा ज्ञानी पुरुषाला विचारून तर ये, की हे माझे आहे की परके आहे? असे विचार ना! विचारशील तर ज्ञानी पुरुष तुला समजावतील की भाऊ, हे सर्व तुझे नाही. हा पाय सुद्धा परका, हे दुसरे सर्व सुद्धा परके, आणि हे तुझे. ज्ञानी पुरुष तुला स्पष्टीकरण करून देतील. ज्ञानी पुरुषांकडून 'सर्वे' (निरीक्षण) करवून घे. हा तर लोकांकडून 'सर्वे' करवून घेतो. पण हे सर्वे करणारेच वेडे आहेत. ते तर परक्या वस्तूलाच माझी मानतात. म्हणजे खरा 'सर्वे' झालेलाच नाही. ज्ञानी पुरुष 'सर्वे' करून वेगळे करून देतात. आणि लाईन ऑफ डिमार्केशन (भेदरेखा) आखून देतात की हा इतका भाग तुझा, आणि हा इतका परका. जे कधीच आपले होत नाही, त्याला म्हणतात परके. कितीही डोकेफोड केली तरीही ते आपले होत नाही.

मरणकाळ कोणाच्याही हातात नाही. परंतु भगवंताने हे उघड केले नाही की यामागे कॉजेस (कारणे) आहेत. काही ज्ञान असे आहे की ते उघड केले जाऊ शकत नाही. भगवंताने जर ही गोष्ट अशी सविस्तरपणे सांगितली असती तर लोकांना नीट समजली असती. तरी पण भगवंताने ही गोष्ट सांगितली आहे, पण लोकांना समजले नाही. भगवंताने सगळेच स्पष्ट केले आहे. पण ते सर्व सूत्रांमध्ये आहे. त्या लाख सूत्रांना विरघळवले तर इतकेसे विरघळलेल

उरेल. भगवंत जे बोलले ते सोन्याच्या रूपात निघाले आणि ते (सोने) गौतमस्वामींनी सर्व सूत्रांवर चढवले. आता जेव्हा कोणी गौतमस्वामीं सारखे असतील तेव्हा पुन्हा त्या सूत्रांमधून सोने काढतील. पण ते गौतमस्वामींसारखे येतील केव्हा, सोने निघेल केव्हा आणि आपले कल्याण होईल केव्हा?

## 'मारायचे नाही' हा निश्चय करा

आता कित्येक लोकांनी निश्चय केला की 'आपल्याला नावालाही हिंसा करायची नाही. कोणत्याही जीवजंतूला मारायचे नाही.' असा निश्चय केला असेल तर मग त्याच्याकडे मरण्यासाठी कोणी जीवजंतू चुकूनही येत नाही. त्याच्या पायाखाली आले तरीही तो वाचतो व निघून जातो. आणि ज्याने 'मला जीवांना मारायचेच आहे' असा निश्चय केला आहे, तिथे मरण्यासाठी सर्व गोळा होतात.

बाकी, भगवंताने सांगितले आहे की, या जगात कुठलाही मनुष्य कुठल्याही जीवाला मारू शकतच नाही. तेव्हा कोणी म्हणेल, 'हे भगवंत, तुम्ही असे का बोलता? आम्ही तर मारताना बघत असतो ना सगळ्यांना!' तेव्हा भगवंत म्हणतात, 'नाही, त्याने मारण्याचा भाव केला आहे आणि या जीवाचा मरणकाळ जवळ येत आहे.' म्हणजे जेव्हा याचा मरणकाळ येतो तेव्हा त्याचा योग जुळून येतो. ज्याने मारण्याचा भाव केला आहे त्याला तो येऊन मिळतो. बाकी, मारू शकतच नाही. पण मरणकाळ येतो म्हणून मरतो आणि तेव्हाच तो भेटतो. ही गोष्ट खूप सूक्ष्म आहे. आज जर हे जगाला समजले असते ना, तर जग आश्चर्यचकितच झाले असते!

**प्रश्नकर्ता :** ट्रेनमध्ये ॲक्सिडन्ट होतो आणि ट्रेन खाली माणूस मरून जातो. तर यात ट्रेनने कुठे निश्चय केला आहे?

**दादाश्री :** ट्रेनला निश्चयाची गरजच नसते. हे तर ज्याचा मृत्यूकाळ जवळ येतो ना, तेव्हा तो म्हणतो 'मी वाटेल त्याप्रकारे मरेन मला त्याची पर्वाच नाही' असे भाव असतील तर त्याला तसे

मरण येईल. त्याने जसा भाव केला असेल त्या भावानुसारच त्याचा हिशोब येत असतो. परंतु मरणकाळ आल्याशिवाय कोणाकडून मरत नाही.

म्हणजे यात कोणते वाक्य समजायचे आहे? की जोपर्यंत त्या जीवाचा मृत्यूकाळ आलेला नसेल तोपर्यंत त्याला कोणी मारू शकतच नाही. आणि मृत्यूकाळ कोणाच्याही हातात नाही.

## नाही 'मरत' कोणी भगवंताच्या भाषेत

**प्रश्नकर्ता :** पण हिंसा न करणे हा दैवीगुण आहे की नाही? म्हणजे हिंसा करणे हा गुन्हा आहे की नाही?

**दादाश्री :** मी तुम्हाला गुपित उघड करून सांगू?! या सर्वांच्या समोर सांगू, इथे कोणी दुरुपयोग करेल असे नाही म्हणून सांगतो.

या जगात भगवंताच्या दृष्टीने कोणी मरतच नाही. भगवंताच्या भाषेत कोणी मरत नाही, लोकभाषेत मरतात. या भ्रांतीच्या भाषेत मरतात. ही गोष्ट उघडपणे सांगितली. मी असे कधीच बोललो नाही. आज तुमच्या समक्ष बोलतो.

भगवंताच्या ज्ञानात जे वर्तत आहे तेच माझ्या ज्ञानात वर्तत आहे, आणि ते असे आहे की या जगात कोणी जिवंतही नाही आणि कोणी मेलाही नाही. आत्तापर्यंत, हे जग चालत आले आहे तेव्हापासून कोणी मेलाच नाही. जो मरताना दिसतो ती भ्रांतीच आहे आणि जन्म घेताना दिसतो ती सुद्धा भ्रांतीच आहे. ही भगवंताच्या भाषेतली वास्तविकता मी तुम्हाला उघडपणे सांगितली. आता तुम्हाला जुन्या गोष्टींना धरून बसायचे असेल तर धरून बसा आणि नसेल धरायचे तर नव्याला धरून ठेवा. ही आमची गोष्ट समजली का तुम्हाला?

**प्रश्नकर्ता :** हो समजली, पण तुम्ही खूप मोघममध्ये सांगितली.

**दादाश्री :** हो, म्हणजे भगवंताच्या भाषेत कोणी मरत नाही.

समजा एखाद्या ठिकाणी हजारो माणसे कापली गेली असतील हे महावीर भगवंतांना समजले, तरी महावीर भगवंतांवर त्याचा काहीच परिणाम होत नाही. कारण त्यांना माहीत आहे की कोणी मरतच नाही. लोकांना असेच वाटते की मरत आहे, खरोखर मरत नाही. हे जे दिसते ती सर्व भ्रांती आहे. मला कधीही कोणी मरताना दिसलेच नाही ना! तुम्हाला दिसते, म्हणून तुम्हाला तेवढी शंका वाटत राहते. की, 'काय होईल, काय होईल?' तेव्हा मी म्हणेन की, 'भाऊ, काहीही होणार नाही. तू माझ्या आज्ञेत रहा.'

म्हणजे आज मी खूप सूक्ष्म गोष्ट सांगून टाकली की भगवंताच्या भाषेत कोणी मरतच नाही. पण तरी लोकांनी भगवंताला सांगितले, 'भगवंत, हे ज्ञान आज उघडच करा ना!' तेव्हा भगवंताने सांगितले, 'नाही, ते उघडपणे सांगता येईल असे नाही. मग तर लोक असेच समजतील की कोणी मरतच नाही. म्हणून ते कोणालाही खाऊन टाकण्याचा भाव करतील, भाव बिघडवतील.' लोकांचे भाव बिघडतील म्हणूनच भगवंतानी हे ज्ञान उघड केले नाही. अज्ञानी लोकांना भाव बिघडवायला वेळच लागत नाही, आणि भाव बिघडले म्हणजे तो 'स्वत:' तसाच होऊन जातो. कारण जे आहे ते स्वत:च आहे, त्याचा कोणी *उपरी* नाहीच.

म्हणून जोपर्यंत भ्रांति आहे तोपर्यंत असे बोलूच नये की भगवंताच्या भाषेत कोणी मरत नाही. हे तर तुम्ही नेमके तेच विचारले म्हणून मला हे रहस्य उलगडावे लागले. त्यातही आपल्या 'महात्म्यां'समोर हे सांगण्यास हरकत नाही. हे 'महात्मा' दुरुपयोग करणारे नाहीत. तुम्ही 'भगवंताच्या भाषेत कोणी मरत नाही' असे तिथे सगळ्यांसमोरही सांगाल का?

**प्रश्नकर्ता :** मला कोणाची भीती नाही. मी तर हिमतीने सांगेन.

**दादाश्री :** नका सांगू. हे ज्ञान सगळ्यांसमोर उघड करण्यासारखे

नाही. भगवंताच्या भाषेचे हे ज्ञान तर जो 'शुद्धात्मा' झाला आहे त्यानेच जाणण्यासारखे आहे. दुसऱ्यांनी हे ज्ञान जाणण्यासारखे नाही. दुसऱ्या लोकांसाठी हे पॉइजन (विष) आहे.

## भारतात भावहिंसा खूप

**प्रश्नकर्ता :** अहिंसेचा व्यापक प्रचार करण्यासाठी खूप वेळ लागेल?

**दादाश्री :** खूप वेळ लागला तरी देखील पूर्ण प्रचार होऊ शकणार नाही. कारण संसार म्हणजे काय? हिंसात्मक मनोवृतीच आहे. म्हणून ते जमणार नाही. हिंदुस्तानात लोक थोडीफार अहिंसा पाळण्यास तयार होतात, बाकी इतर लोक तर अहिंसेला समजतच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** पण जीवांना वाचवणे, यामागे सूक्ष्म अहिंसेचा भाव आहे का?

**दादाश्री :** वाचवणे म्हणजे सूक्ष्म नाही, ही तर स्थूल अहिंसा आहे. सूक्ष्म तर त्यांना समजणारच नाही. सूक्ष्म अहिंसा कशी समजतील? ज्या लोकांना अजून स्थूलच समजत नाही, त्यांना सूक्ष्म कशी समजेल? आणि ही स्थूल अहिंसा तर त्यांच्या रक्तातच आहे ना, म्हणूनच अशा लहान प्रकारच्या जीवांची अहिंसा पाळतात. बाकी, हे सर्व लोक स्वतःच्या घरात दिवसभर हिंसाच करत राहतात, सगळेच, फक्त काही अपवाद सोडले तर!

**प्रश्नकर्ता :** या वेस्टर्न कंट्रिजमध्ये पण निरंतर हिंसाच करत राहतात. खाण्यात-पिण्यात, प्रत्येक कामात. घरात सुद्धा हिंसा. माशा मारणे, डास मारणे, बाहेर लॉनमध्येही हिंसा, औषध फवारणे, जीवजंतू मारणे, बाग-बगीचात पण हिंसा, मग ते लोक कसे सुटतील?

**दादाश्री :** अरे, त्यांच्या हिंसेपेक्षा हे हिंदुस्तानातील लोक जास्त

हिंसा करतात. त्या हिंसेपेक्षा ही हिंसा खूप खराब आहे, दिवसभर आत्म्याचीच हिंसा करत राहतात. याला भावहिंसा म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** हे लोक तर स्वतःच्या आत्म्याचीच हिंसा करतात, पण ते (वेस्टर्नचे) लोक तर दुसऱ्यांच्या आत्म्याची हिंसा करतात.

**दादाश्री :** नाही. हे लोक तर सगळ्यांच्याच आत्म्याची हिंसा करतात. जो कोणी भेटतो त्या सगळ्यांचीच हिंसा करतात. यांचा धंदाच उलटा आहे. म्हणून तर ते (वेस्टर्नचे) लोक सुखी आहेत ना! दुसरे, म्हणजे त्यांना दुसऱ्यांना दुःख देण्याचा विचार देखील येत नाही. आणि 'आय वील हेल्प यु, आय वील हेल्प यु' (मी तुम्हाला मदत करीन) असे सांगतात. आणि आपल्या इथे तर स्वार्थ ठेवतात, 'माझा फायदा होत असेल' तर मदत करणार, नाही तर करणार नाही. आधी हिशोब काढून बघतात की माझा फायदा होईल का! असा हिशोब काढतात की नाही काढत?

म्हणूनच भगवंताने भावहिंसेला खूप मोठी हिंसा म्हटली आहे आणि हा पूर्ण हिंदुस्तान भावहिंसाच करत आहे.

**प्रश्नकर्ता :** परंतु हिंदुस्तानात तर अहिंसेला सर्वात जास्त महत्त्व दिले गेले आहे.

**दादाश्री :** तरीसुद्धा सर्वात जास्त हिंसा इथल्या लोकांची आहे. कारण दिवसभर कटकट, कटकट आणि कटकटच करत राहतात. याचे काय कारण? तर येथील लोक जास्त जागृत आहेत. तरी पण आजची जी मुले उलट मार्गावर वळली आहेत, ते बिचारे अशी जास्त भावहिंसा करत नाहीत! कारण ते मांसाहार आणि व्यसन वगैरे करतात, म्हणून जडासारखे होऊन गेले आहेत. जडात जास्त भावहिंसा नसते. बाकी, अधिक जागृत असतात तिथे निव्वळ भावहिंसाच असते. म्हणूनच दिवसभर कटकट, कटकट... ग्लास फुटला तरी कटकट! काही झाले तरी कटकट!

## भाव स्वतंत्र, द्रव्य परतंत्र

**प्रश्नकर्ता :** ते काहीही असो पण त्यांच्याकडून अहिंसा तर झालीच ना!

**दादाश्री :** भाव ही स्वतंत्र हिंसा आहे. आणि द्रव्य ही परतंत्र हिंसा आहे. ती स्वत:च्या ताब्यात नाही. म्हणजे हे परतंत्र अहिंसा पाळतात. हा त्यांचा आजचा पुरुषार्थ नाही.

म्हणजे ही जी अहिंसा आहे ती स्थूल जीवांसाठीची अहिंसा आहे. पण ती चुकीची नाही. मात्र भगवंताने काय सांगितले की, जी अहिंसा तुम्ही बाहेर पाळता, ती पूर्णपणे पाळा, सूक्ष्म जीव किंवा स्थूल जीव, सगळ्यांसाठी अहिंसा पाळा. पण तुमच्या आत्म्याची भावहिंसा होणार नाही हे प्रथम पाहा. आणि इथे तर निरंतर भावहिंसाच होत राहिली आहे. आता लोक तोंडाने तर भावहिंसा बोलतात, पण ही भावहिंसा कशास म्हणतात, हे समजून घेतले पाहिजे ना? माझ्याशी चर्चा केली तर मी त्यांना समजावेन.

भावहिंसा तर कोणालाही दिसत नाही आणि या चित्रपटासारखी, म्हणजे जसा चित्रपट चालतो ना, आणि आपण तो बघत असतो, अशी दिसते ती सर्व द्रव्यहिंसा आहे. भावहिंसेत असे सूक्ष्मरूपात होत असते आणि द्रव्यहिंसा तर दिसते. प्रत्यक्ष मन, वचन, कायेने या जगात जे दिसते, ती द्रव्यहिंसा आहे.

## बचाव करा, प्रथम भावहिंसेपासून

म्हणजे भगवंताने अहिंसा वेगळ्या प्रकारची सांगितली की, फर्स्ट अहिंसा कोणती? तर आत्मघात होऊ नये. प्रथम आतून भावहिंसा होणार नाही हेच पाहायला सांगितले. त्याऐवजी हे तर कुठल्याकुठेच पोहोचले. ही तर सगळी भावहिंसाच होत आहे, निरंतर भावहिंसा होत आहे. म्हणून सुरुवातीला भावहिंसा बंद करायची आहे, आणि द्रव्यहिंसा तर कोणाच्याही हातात नाही. पण तरी असे

बोलू नये. बोलाल तर जोखीम येईल. बाहेर सगळ्यांसमोर बोलू नये. समजदार व्यक्तीलाच सांगू शकतो. म्हणून वीतरागांनी सर्वच उघड केले नाही. बाकी, द्रव्यहिंसा कोणाच्याच हातात नाही, कोणत्याही जीवाच्या ताब्यात नाही. पण जर असे सांगण्यात आले तर लोक पुढचा जन्म बिघडवतील. कारण भाव केल्याशिवाय राहणारच नाहीत ना! म्हणतील की, 'जर हे तर आपल्या हातातच नाही, तर आता मारण्यात काही दोषच नाही ना!' ही भावहिंसाच बंद करायची आहे. म्हणजे वीतरागी किती समंजस! या बाबतीत एक अक्षर सुद्धा लिहिले आहे का? पहा ना, थोडे तरी लीकेज होऊ दिले का! तीर्थंकर किती समंजस पुरुष होते, जिथे पाऊल ठेवतील तिथे तीर्थ!

पण तरी द्रव्यहिंसा बंद केली तरच भावहिंसा थांबेल असे आहे. कारण भावहिंसा हीच मुख्य गोष्ट आहे. म्हणून जीवांच्या 'हिंसे–अहिंसेत' पडू नका असे भगवंतांनी सांगितले आहे. भगवंत तर सांगतात की, 'तू भावहिंसा करू नकोस. मग तू अहिंसक ठरशील.' इतकेच भगवंतानी सांगितले आहे.

## अशी होते भाव अहिंसा

सर्वात मोठी हिंसा भगवंताने कशास म्हटले आहे? तर 'या माणसांनी एखाद्या जीवाला मारून टाकले, त्यास आम्ही हिंसा म्हणत नाही. पण या माणसांनी जीवाला मारण्याचे भाव केले, त्याला आम्ही हिंसा म्हटले आहे.' बोला आता, लोक काय समजतात? की 'याने जीवाला मारून टाकले, म्हणून यालाच पकडा.' तेव्हा कोणी म्हणेल, 'याने जीवाला मारले तर नाही ना?' मारले नसेल त्यासही हरकत नाही. पण याने भाव तर केला ना की, जीव मारले पाहिजेत. म्हणून तोच गुन्हेगार आहे. आणि जीवाला तर 'व्यवस्थित शक्ती' मारते. तो फक्त अहंकारच करतो की 'मी मारले.' आणि जो भाव करतो तो तर स्वतःच मारतो.

तुम्ही म्हणाल की जीवांना वाचवायला हवे. नंतर वाचतील की वाचणार नाहीत त्याचे जोखीमदार तुम्ही नाही. तुम्ही म्हणाल की, या जीवांना वाचवायला हवे, तुम्हाला फक्त असा भावच करायचा आहे. नंतर हिंसा झालीच तर त्याचे जोखीमदार तुम्ही नाही! हिंसा झाली त्याचा पश्चात्ताप, त्याचे प्रतिक्रमण करायचे, म्हणजे सर्व जोखीमदारी संपली.

आता अशा सर्व सूक्ष्म गोष्टी मनुष्याला कशा समजतील? त्याची काय क्षमता? एवढे दर्शन तो कुठून आणेल? आणि माझ्या या सर्व गोष्टी तो तिथे घेऊन गेला तर सगळी गैरसमजच होईल. आम्ही पब्लिकसमोर असे सांगत नाही. पब्लिकला सांगू शकत नाही ना! तुम्हाला समजले का?

भावअहिंसा म्हणजे मला कोणत्याही जीवाला मारायचे आहे असा भाव कधीच होता कामा नये, आणि मला कोणत्याही जीवाला दु:ख द्यायचे आहे, असा भाव सुद्धा उत्पन्न होता कामा नये. मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख न होवो, अशी फक्त भावनाच करायची आहे, क्रिया नाही. भावनाच करायची आहे. क्रियेत तर तू कसे काय वाचवशील? अरे, फक्त श्वासोच्छवासातच लाखो जीव मरत असतात. आणि इथे तर जीवांचे थवे आदळतात, आदळल्यानेच मरून जातात. कारण आपण त्यांना मोठया दगडासारखे वाटतो. त्यांना असेच वाटते की हा दगड आपटला.

## सर्वात मोठी आत्महिंसा, कषाय

जिथे क्रोध-मान-माया-लोभ (कषाय) आहेत ती आत्महिंसा आहे आणि ती दुसरी तर जीवांची हिंसा आहे. भावहिंसेचा अर्थ काय? तर तुझी स्वत:ची जी हिंसा होत असते, हे क्रोध-मान-माया-लोभ, हे तुला स्वत:ला बंधनात टाकत असतात म्हणून प्रथम स्वत:वर दया कर. प्रथम स्वत:ची भावअहिंसा आणि नंतर दुसऱ्यांची भावअहिंसा, असे सांगितले आहे.

या छोटया जीवजंतूंना मारणे ही द्रव्यहिंसा म्हटली जाते आणि कोणाला मानसिक दु:ख देणे, कोणावर क्रोध करणे, रागावणे, हे सर्व हिंसकभाव म्हटले जातात, भावहिंसा म्हटली जाते. लोकांनी जरी कितीही अहिंसेचे पालन केले, तरी पण अहिंसा इतकी सोपी नाही की लवकर पाळली जाईल. खरे म्हणजे क्रोध, मान, माया आणि लोभ हे पण कषाय हीच खरी हिंसा आहे. जीवजंतू मारतात, रेडकांना मारतात, म्हशी मारतात ती सर्व द्रव्यहिंसा आहे. आणि ते निसर्गाने लिहिल्यानुसारच होत राहते. यात कोणाचेही चालत नाही.

म्हणून भगवंताने काय सांगितले होते की प्रथम, स्वत:कडून कषाय होणार नाही असे कर. कारण कषाय ही सर्वात मोठी हिंसा आहे. ती आत्महिंसा म्हटली जाते, भावहिंसा म्हटली जाते. द्रव्यहिंसा झाली तरी एक वेळ चालेल, परंतु भावहिंसा मात्र होऊ देऊ नकोस. पण हे लोक द्रव्यहिंसेला थांबवतात पण भावहिंसा तर चालूच राहते.

म्हणून जर कोणी निश्चित केले की 'मला मारायचे नाहीच' तर त्याच्या वाट्याला कोणी मरायला येणार नाही. आता याने अशी स्थूलहिंसा तर बंद केली की, मला कुठल्याही जीवाला मारायचे नाही. पण मग बुद्धीने मारायचे असे जर निश्चित केले असेल तर त्याचा बाजार उघडाच राहतो. मग तिथे येऊन पाखरे आपटत राहतात, मग ती सुद्धा हिंसाच आहे ना!

म्हणून कोणत्याही जीवाला त्रास होता कामा नये, दु:ख होता कामा नये. कोणत्याही जीवाची किंचितदेखील हिंसा होता कामा नये. तसेच कोणत्याही माणसांसाठी जरासुद्धा वाईट अभिप्राय असू नये. शत्रुसाठीही अभिप्राय बदलला तरी ती सर्वात मोठी हिंसा आहे. एक बकरा मारला त्याहीपेक्षा ही मोठी हिंसा आहे. घरच्या माणसांवर चिडणे, ही बकरा मारण्यापेक्षाही मोठी हिंसा आहे. कारण चिडणे हा आत्मघात आहे. आणि बकऱ्याचे मरणे ही वेगळी गोष्ट आहे.

आणि माणसांची निंदा करणे हे सुद्धा मारण्यासारखेच आहे. म्हणून निंदेत तर पडायचेच नाही. माणसाची निंदा अजिबात करायची नाही, कधीच नाही. ती सुद्धा हिंसाच आहे.

नंतर, जिथे पक्षपात आहे तिथे हिंसा आहे. पक्षपात म्हणजे आम्ही वेगळे आणि तुम्ही वेगळे, तिथेही हिंसा आहे. तसे तर अहिंसेचा बिल्ला लावतात की आम्ही अहिंसक माणसे आहोत. आम्ही अहिंसेलाच मानणारे आहोत. पण भाऊ, पहिली हिंसा म्हणजेच हा पक्षपात. एवढा शब्द जरी समजला तरी पुष्कळ झाले. म्हणून वीतरागींची गोष्ट समजण्याची गरज आहे.

## स्वतःचे भावमरण क्षणोक्षणी

संपूर्ण जगातील लोकांना रौद्रध्यान आणि आर्तध्यान आपोआपच होत राहते. त्यासाठी तर काहीच करायचेच नाही. म्हणजे या जगात सर्वात मोठी हिंसा कोणती? तर आर्तध्यान आणि रौद्रध्यान! कारण त्याला आत्महिंसा म्हटली जाते. त्या जीवजंतूंची हिंसा, ती तर पुद्‌गलहिंसा म्हटली जाते आणि ही तर आत्महिंसा म्हटली जाते. मग कोणती हिंसा चांगली?

**प्रश्नकर्ता :** हिंसा तर कुठलीही चांगली नाही. परंतु आत्महिंसा ही सर्वात मोठी हिंसा मानली जाईल.

**दादाश्री :** लोक पुद्‌गलहिंसा तर खूप पाळतात. पण त्यांच्याकडून आत्महिंसा होतच राहते. आत्महिंसेला शास्त्रकारांनी भावहिंसा म्हटली आहे. आता या ज्ञानानंतर तुमची भावहिंसा बंद होते. म्हणूनच आत किती शांती वाटते ना!

**प्रश्नकर्ता :** कृपाळुदेवांनी या भावहिंसेला भावमरण म्हटले आहे ना? कृपाळुदेवांचे वाक्य आहे, '*क्षण क्षण भयंकर भावमरणे का अहो राची रह्यो.*' यात समय-समयचे भावमरण होत असते का? (समय - क्षणाचाही अत्यंत छोटा भाग).

**दादाश्री :** हो, क्षण-क्षण भयंकर भावमरण, म्हणजे ते काय सांगू इच्छितात? तसे तर प्रत्येक क्षणी भावमरण नाही, परंतु प्रत्येक समयाला भयंकर भावमरण होत असते. पण हे तर स्थूलरूपात लिहिलेले आहे. उलट इथे तर समय-समय भावमरण होतच राहिले आहे. भावमरण म्हणजे काय? तर 'मी चंदुलाल (चंदुलालच्या जागी वाचकाने स्वत:चे नाव समजावे) आहे' हेच भावमरण आहे. जी अवस्था उत्पन्न झाली, ती अवस्था 'मला'च झाली, असे मानणे म्हणजेच भावमरण झाले. या सर्व लोकांची रममाणता भावमरणातच आहे की, 'हे सामायिक मी केले, हे मी केले.'

**प्रश्नकर्ता :** तर मग भाव जिवंत कसे होऊ शकतात?

**दादाश्री :** भाव तसे जिवंत नाहीत. भावाचे तर मरण झाले आहे. भावमरणाला निद्रा म्हटले जाते. भावनिद्रा आणि भावमरण दोन्ही एकच आहे. या 'अक्रम विज्ञानात' आम्ही भाव ठेवतच नाही म्हणून भावमरण होतच नाही, आणि 'क्रमिक'मध्ये तर क्षणोक्षणी सर्व जण भावमरणातच असतात. कृपाळुदेव तर ज्ञानी पुरुष होते ना, म्हणून फक्त त्यांनाच हे समजले. त्यांना असे वाटायचे की, 'हे तर भावमरण झाले. हे भावमरण झाले.' म्हणून ते निरंतर जागृत राहायचे. दुसरे लोक तर भावमरणातच चालत राहतात.

भावमरणाचा अर्थ काय? तर स्वभावाचे मरण झाले आणि विभावाचा जन्म झाला. अवस्थेत 'मी' म्हणजेच विभावाचा जन्म झाला. आणि 'आपण' त्या अवस्थेला 'पाहतो' म्हणजे स्वभावाचा जन्म झाला.

म्हणजे ही पुद्‍गलहिंसा जिथे असेल, तिथे सुटण्याचा काही तरी मार्ग निघेल. परंतु आत्महिंसा करणाऱ्याची तर सुटका होतच नाही. लोक असे बारकाईने समजावतच नाहीत ना! सर्व वरवर समजावतात!

## अहिंसेने वाढली बुद्धी

असे आहे, हे आर्तध्यान आणि रौद्रध्यान तर मुसलमानांनाही होत असते, ख्रिश्चन लोकांनाही होत असते, सगळ्यांनाच होत असते आणि आपल्या लोकांनाही होत असते. मग त्यात फरक काय आहे? डिफरन्स काय? उलट आपल्या लोकांना तर जास्त होत असते. कारण जीवहिंसेत थोडी मर्यादा ठेवलेली आहे. अहिंसा धर्म पाळतात, त्यामुळे जास्त होते. कारण त्याची बुद्धी खूप तेज असते, बुद्धीशाली असतो. आणि दूषमकाळात बुद्धी जितकी जास्त तितके भयंकर पाप बांधतो. आणि जास्त बुद्धी असलेला कमी बुद्धीवाल्याला मारतोसुद्धा.

फॉरेनवाले आणि मुसलमान कोणीही बुध्दीने मारत नाही. आपले हिंदुस्तानचे लोक तर बुद्धीने मारतात. बुद्धीने मारण्याचे कोणत्याच काळात नव्हते. या काळातच हे नवीन लफडे सुरू झाले आहे. बुद्धी असेल तर मारेल ना?! बुद्धी कोणाला असते? एक तर जे जीवांचा घात करत नाहीत, अहिंसक धर्म पाळतात, आणि सहा कायच्या जीवांची हिंसा करत नाहीत त्यांची बुद्धी वाढते. शिवाय कोणी कंदमूळ खात नसेल, त्याची बुद्धी वाढते. तीर्थंकरांच्या मूर्तीचे दर्शन करतात त्यांची बुद्धी वाढते. आणि ही बुध्दी वाढली त्याचा काय लाभ झाला?

**प्रश्नकर्ता :** अशा लोकांवर तुम्ही अन्याय करत आहात.

**दादाश्री :** अन्याय करत नाही. जास्त बुद्धी आहे म्हणून त्यांचे नुकसान होईल, असे मी पुस्तकात लिहिले आहे. जसे आहे तसे नाही सांगितले तर आणखी अधिक चुकीच्या मार्गाने चालतील. बुद्धीने मारणे हा भयंकर गुन्हा आहे. बुद्धी वाढली त्याचा असा दुरुपयोग करायचा असतो का? आणि ज्यांना जागृती कमी आहे ते बिचारे मंदकषायी असतात.

अहिंसा धर्माचे पालन करतात, जन्मतः छोट्या जीवांची हिंसा

करायची नाही असे त्यांच्या बिलिफमध्ये (मान्यतेत) असते, त्यांच्या दर्शनात असते, ते खूप तीक्ष्ण बुद्धीवाले असतात.

**प्रश्नकर्ता :** जन्मल्यापासूनच अहिंसेचे पालन करतात म्हणून ते जास्त मृदु म्हटले जातात ना?

**दादाश्री :** मृदु म्हटले जात नाहीत. अहिंसा पाळण्याचे फळ आले. फळ स्वरूपात त्यांची बुद्धी वाढली आणि त्या बुद्धीने लोकांना मारत राहिले, बुद्धीने गोळ्या मारल्या. विनाकारण खून केल्याने एका जन्माचे मरण झाले, परंतु बुद्धीने गोळ्या मारल्याने अनंत जन्मांचे मरण होईल.

## मोठी हिंसा, लढाईची की कषायांची

पूर्वीच्या काळी गावात जे शेठ असायचे, ते जास्त बुद्धीमान असत ना! गावात कुणा दोघांचे भांडण झाले असेल तर शेठ त्याचा गैरफायदा घेत नसत. ते त्या दोघांनाही आपल्या घरी बोलावीत आणि दोघांच्या भांडणाचा निकाल करीत. आणि वर दोघांना आपल्या घरी जेवू घालीत. कशा प्रकारे निकाल लावत? तर दोघांपैकी एकाने जर सांगितले की, 'साहेब, आता माझ्याजवळ दोनशे रुपये नाहीत, मग मी आत्ताच्या आता कसा देऊ शकेन?' तेव्हा शेठ म्हणत, 'तुझ्याजवळ किती पैसे आहेत?' तेव्हा तो म्हणे, 'पन्नासएक आहेत.' तेव्हा शेठ म्हणत, 'मग माझ्याकडून दीडशे घेऊन जा.' म्हणजे असे भांडण मिटवत. आणि आता तर लोकांच्या भांडणाचा गैरफायदा घेतील!

मी कोणावर आक्षेप घेत नाही. मी संपूर्ण जगाला निरंतर निर्दोषच पाहतो. या सर्व तर व्यावहारिक गोष्टी चालत आहेत. मला शिव्या दिल्या, मारले, चापट्या मारल्या, काहीही केले तरी पण मी जगाला निर्दोषच पाहतो. हे सर्व तर मी व्यवहाराविषयी सांगत आहे. व्यवहार जर समजला नाही तर पार कसा येईल? आणि ज्ञानी पुरुषांकडून समजून घेतल्याशिवाय कामी येणार नाही. बाकी, माझा कोणाबरोबरच वाद नाही.

**प्रश्नकर्ता :** आपल्या इथे एवढेसे लहान मूल सुद्धा अहिंसा पाळत असते, तर ते त्याच्या मागील जन्माचे संस्कार आहेत ना?

**दादाश्री :** हो, म्हणूनच ना! संस्काराशिवाय तर असे मिळणारच नाही ना! पूर्व जन्माचे संस्कार आणि पुण्याच्या आधाराने हे मिळाले, पण आता दुरुपयोग केल्याने कुठे जाईल हे माहीत आहे का? आता कुठे जाणार आहे त्याचे काही सर्टिफिकेट आहे का?

**प्रश्नकर्ता :** तो तर अहिंसाच पाळत आहे. त्याचा दुरुपयोग कुठे करत आहे?

**दादाश्री :** याला अहिंसा म्हणूच कसे शकतो? मनुष्यांसोबत कषाय करणे, यासारखी मोठी हिंसाच या जगात नाही. असा एक तरी शोधून आणा की, जो घरात कषाय करत नाही, हिंसा करत नाही. दिवसभर घरात कषाय करणे आणि स्वत:ला अहिंसक म्हणवून घेणे, हा तर भयंकर मोठा गुन्हा आहे. फॉरेनवाल्यांना एवढे कषाय होत नसतात. कषाय तर जास्त जागृतीवालेच करतात ना! तुम्हाला हे समजते की जास्त जागृती असणारा कषाय करतो की कमी जागृती असणारा कषाय करतो? कषाय करणे हा भयंकर गुन्हा आहे, असे तुम्हाला नाही का वाटत?

**प्रश्नकर्ता :** हो, बरोबर आहे.

**दादाश्री :** हो, मग यासारखी दुसरी कोणतीच हिंसा नाही. कषाय हीच हिंसा आहे आणि ही अहिंसा तर जन्मजात अहिंसा आहे. पूर्वी फक्त भावनाच केली होती आणि आज ती भावना उदयात आली. म्हणजे क्रोध-मान-माया-लोभ, ही हिंसा थांबली तरच हिंसा थांबेल.

**प्रश्नकर्ता :** हो बरोबर आहे. हे समजले. शास्त्रातही असे सांगितले आहे. चक्रवर्ती राजा एवढे सारे युद्ध करीत, हिंसा करीत तरीसुद्धा त्यांना अनंतानुबंधी कषाय लागले नाहीत. पण जे कुगुरु, कुधर्म आणि कुसाधूंना मानतात, ते लोकच अनंतानुबंधी कषाय बांधतात.

**दादाश्री :** बस, यासारखी अनंतानुबंधी दुसरी कोणतीच नाही. हे तर उघडपणे सांगितले आहे ना!

## बुद्धीने मारतात ते हार्ड रौद्रध्यान

**प्रश्नकर्ता :** पण यात सर्व कर्मांचे भेद आहेत की नाही?

**दादाश्री :** पण समजत नाही का? हे तर लहान मुलालाही समजेल असे आहे. आपण कंदील घेऊन जात असू आणि त्याच्याजवळ पणतीच असेल, त्या बिचाऱ्याला अंधारात दिसत नसेल, तर आपण त्याला म्हणतो ना की थांबा काका, मी येतो, कंदील धरतो. कंदील धरतो की नाही? तेव्हा ही बुद्धीसुद्धा लाईटसारखीच आहे. ज्याची कमी बुद्धी असेल त्याला आपण म्हटले की, 'भाऊ, असे नाही, नाही तर तुमची फसवणूक होईल. याऐवजी तुम्ही अशा प्रकारे करा.' पण इथे तर लगेच शिकारच करून टाकतात. तावडीत सापडले की लगेच शिकार! म्हणून मी कडक शब्द लिहिले की हार्ड रौद्रध्यान! चार आऱ्यात कधीच झाले नाही असे या पाचव्या आऱ्यात झाले आहे. बुद्धीचा दुरुपयोग करू लागले आहेत. (आरा = कालचक्राचा एक भाग)

आणि हे जे व्यापारी आहेत ते जास्त बुद्धीवाले म्हणून कमी बुद्धीवाल्यांना फसवतच राहतात. जास्त बुद्धीवाला व्यापारी कमी बुद्धी असलेले ग्राहक आले, तर त्यांना लुटतो. कमी बुद्धी असलेल्याकडून काही पण लुटून घेणे यास भगवंताने रौद्रध्यान म्हटले आहे. आणि त्याचे फळ जबरदस्त नरक म्हटले आहे. म्हणून बुद्धीचा दुरुपयोग करू नये.

बुद्धी ही तर लाईट आहे. मग कोणी अंधारात जात असेल त्याला लाईट दाखविण्याचेही तुम्ही पैसे मागता? अंधारात एखाद्या माणसाजवळ फक्त छोटासा कंदीलच असेल तर आपण त्या बिचाऱ्याला लाईट नको का दाखवायला? बुद्धीच्या सहाय्याने लोकांनी दुरुपयोग केला ते हार्ड रौद्रध्यान, नरकात जाऊनसुद्धा सुटणार नाहीत. कोणत्याच

काळात झाले नव्हते असे हार्ड रौद्रध्यान या पाचव्या आऱ्यात होत आहे. बुद्धीने मारतात का? माहीत आहे का तुम्हाला?

बुद्धीने मारतात तो तर भयंकर गुन्हा आहे. अजूनही जर असे करणे बंद केले आणि आत्तापर्यंत जे केले त्याचा पश्चात्ताप केला आणि पुन्हा नव्याने असे केले नाही, तरी ठीक आहे. नाही तर याचा काही अंतच नाही. ही बेजबाबदारी आहे.

## इतके करा, आणि अहिंसक बना

आपण मनात हिंसकभाव ठेवू नये. 'मला कोणाचीही हिंसा करायची नाही' असा पक्का भाव ठेवावा. आणि सकाळच्या प्रहरी बोलावे, 'प्राप्त मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्र दुःख न होवो.' असा भाव बोलून नंतर संसारी कार्यांची सुरुवात करावी. म्हणजे मग जबाबदारी कमी होऊन जाते. नंतर तुमच्या पायाखाली एखादा जीव मारला गेला तरीही तुम्ही जोखीमदार नाहीत. कारण आज तुमचा तसा भाव नाही. भगवंत तुमची क्रिया बघत नाहीत, तुमचा भाव बघतात. निसर्गाच्या खातेवहीत तुमचा भाव बघितला जातो. आणि येथील सरकार येथील लोक खातेवहीत तुमची क्रिया बघतात. लोकांची खाती तर इथल्या इथेच पडून राहणार, आणि तिथे तर निसर्गाचे खाते उपयोगी येईल. म्हणून तुमचा भाव काय आहे तो तपासून बघा.

म्हणून सकाळच्या प्रहरी असे पाच वेळा बोलून जो घराबाहेर निघाला तो अहिंसकच आहे. मग तो कुठेही गडबड करून आला असेल तरीही तो अहिंसकच आहे. कारण घरातून निघाला तेव्हा तो निश्चय करून निघाला होता आणि घरी गेल्यावर पुन्हा कुलूप लावून टाकावे. म्हणजे घरी जाऊन असे म्हणावे की घरून निघताना निश्चय करून निघालो तरी दिवसभरात कोणाला काही दुःख झाले असेल तर मी त्याची माफी मागतो. बस, एवढेच करायचे. नंतर तुमची जोखीमदारीच नाही ना!

कोणत्याही जीवाची हिंसा करायची नाही, करवून घ्यायची नाही

आणि करणाऱ्याला अनुमोदन द्यायचे नाही, आणि माझ्या मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला दु:ख न होवो, अशी भावना सतत ठेवायची की मग तुम्ही अहिंसक झालात! याला अहिंसा महाव्रत पूर्ण झाले असे म्हटले जाईल. मनात भावना निश्चित केली, निश्चित केली म्हणजे डिसीजन. म्हणजे आपण जे निश्चित केले त्यात पूर्णपणे सिन्सियर राहिलो, त्या निर्णयावर ठाम राहिलो, त्यास महाव्रत म्हटले जाईल. आणि निश्चित केले पण त्यावर ठाम राहिलो नाही तर त्यास अणुव्रत म्हटले जाईल.

## सावध व्हा, विषयविकारात हिंसा आहे

भगवंताने जर कधी विषयविकाराच्या हिंसेचे वर्णन केले तर मनुष्य मरून जाईल. लोकांना वाटते की यात काय हिंसा आहे? आपण कोणावर रागावत तर नाही. पण भगवंताच्या दृष्टीने पाहिले तर त्यात हिंसा आणि आसक्ती दोन्हीही एकत्र येतात, त्यामुळे पाचही महाव्रते मोडतात आणि त्यामुळे खूप दोष लागतात. एक वेळच्या विषयामुळे लाखो जीव मरून जातात, त्याचा दोष लागतो. इच्छा नसताना सुद्धा त्यात भयंकर हिंसा आहे. म्हणून रौद्र स्वरूप होऊन जाते.

फक्त विषयविकारामुळेच तर संसार टिकून राहिला आहे. एक हा स्त्रीविषय नसेल ना, तर दुसरे विषय कधीच नडत नाहीत. फक्त या विषयाचा अभाव झाला तरी देवगती मिळेल. या विषयाचा अभाव झाला म्हणजे इतर सर्व विषय ताब्यात येऊन जातात. आणि या विषयात पडला की विषयामुळे तो पशुगतीत जातो. विषयाने केवळ अधोगतीच आहे. कारण फक्त एका विषयात देखील करोडो जीव मरतात. हे जरी त्याला समजत नसेल तरी पण जोखीमदारी तर ओढवूनच घेतो ना!

म्हणून जोपर्यंत संसारीपणा आहे, स्त्रीविषय आहे, तोपर्यंत ते अहिंसेसाठी घातकच आहे. त्यातही परस्त्री ही तर सर्वात मोठी जोखीम आहे. परस्त्री असेल तर नरकाचा अधिकारीच झाला. बस, मग त्याने दुसरे काही शोधूच नये, आणि पुन्हा मनुष्यजन्म मिळेल अशी आशाही

ठेवू नये. हीच सर्वात मोठी जोखीम आहे. परपुरुष आणि परस्त्री हे नरकात घेऊन जाणारे आहेत.

आणि स्वतःच्या घरीही नियम तर असलाच पाहिजे ना? हे तर असे आहे की, स्वतःच्या हक्काच्या स्त्रीशी विषयसंबंध हे अयोग्य नाही. पण तरी त्याचबरोबर इतके समजावे लागेल की त्यात खूप सारे जर्म्स (जीव) मरतात. म्हणून विनाकारण तर असे नसावेच ना? कारण असेल तर गोष्ट वेगळी आहे. वीर्यात 'जर्म्सच' असतात आणि ते मानवबीजाचे असतात. म्हणून शक्यतोवर सांभाळावे. हे आम्ही तुम्हाला थोडक्यात सांगत आहोत. बाकी, याचा तर कधी अंतच येत नाही ना!

## मनाच्या पर अहिंसा

दुसऱ्या खोटया अहिंसेला मानणे याला काय अर्थ? अहिंसा म्हणजे कोणासाठीही वाईट विचार देखील येत नाहीत, यास अहिंसा म्हटली जाते. शत्रूसाठी सुद्धा वाईट विचार येत नाहीत. शत्रूसाठी सुद्धा त्याचे कल्याण कसे होईल, असा विचार येतो. वाईट विचार येणे हा प्रकृती गुण आहे, पण तो बदलणे हा आपला पुरुषार्थ आहे. पुरुषार्थाची ही गोष्ट तुम्हाला समजली की नाही समजली?

अहिंसक भाववाल्यांने तीर मारले तरी जरासुद्धा रक्त निघत नाही आणि हिंसक भाववाल्याने फूल जरी फेकले तरीही रक्त निघेल. तीर आणि फूल इतके इफेक्टिव (परिणामकारक) नाही, जितकी इफेक्टिव ही भावना आहे! म्हणून आमच्या एक-एक शब्दात 'कोणाला दुःख न होवो, जीवमात्राला दुःख न होवो' असा भाव आम्हाला निरंतर राहत असतो. जगातील जीवमात्राला या मन-वचन-कायेने किंचितमात्र पण दुःख न होवो, या भावनेनेच 'आमची' वाणी निघालेली असते. वस्तू काम करत नाही, तीर काम करत नाही, फूल काम करत नाही पण भाव काम करत असतो.

हे 'अक्रम विज्ञान' तर काय सांगते? मनाने पण शस्त्र उगारायचे नाही, तर मग आपण काठी कशी उगारू शकतो? या जगातील

कोणताही जीव, अगदी लहानातील लहान जीवासाठी पण मी मनाने शस्त्र उगारले नाही, कधीच नाही. मग दुसरे काही कसे उगारू शकतो? वाणी जराशी कडक निघते कधीतरीच, वर्षभरात एखाद्या दिवशी. जसे खादी आणि रेशीममध्ये फरक असतो ना, खादी कशी असते? तशी थोडीशी कडक वाणी निघते कधीतरी. तेही वर्षभरात एखाद्या दिवशी. बाकी, वाणीनेही कधी दुःख दिले नाही, आणि मनानेही कधीच शस्त्र उगारले नाही!

अगदी छोट्यात छोटा जीव असेल, पण त्यावर मी मनाने सुद्धा शस्त्र उगारले नाही. या जगातील कोणताही जीव, एखादा छोटा जीव असेल, हा विंचू जरी आता चावला असता तरी पण आम्ही त्याच्यावर शस्त्र उगारले नसते! तो तर त्याचे कर्तव्य बजावून जातो. त्याने जर त्याचे कर्तव्य बजावले नाही तर आपली सुटका होणार नाही. म्हणून कधीच कोणत्याही जीवासाठी मी मन बिघडवलेले नाही, याची खात्री! म्हणजेच मानसिक हिंसा कधीच केली नाही. नाही तर मनाचा स्वभावच आहे, काही तरी दिल्याशिवाय राहतच नाही.

**प्रश्नकर्ता :** तुम्हाला समजलेच असेल की या शस्त्राचे काही कामच नाही.

**दादाश्री :** हो, शस्त्र कामाचेच नाही. या शस्त्राची गरज आहे, असा कधी विचारच आला नाही. आम्ही जेव्हापासून तलवार जमिनीवर ठेवली तेव्हापासून कधी उचललीच नाही. समोरचा शस्त्रधारी असेल तरीही आम्ही कधी शस्त्र धारण केले नाही. आणि शेवटी हाच मार्ग धरावा लागेल. ज्याला या जगातून पळून जायचे असेल, ज्याला हे जग अनुकूल वाटत नाही, त्याला शेवटी हाच मार्ग धरावा लागेल, दुसरा मार्गच नाही.

म्हणून फक्त एक अहिंसा जरी सिद्ध केली तरीही खूप झाले. संपूर्ण अहिंसा सिद्ध केली तर तिथे वाघ आणि बकरी सोबत पाणी पितील!

**प्रश्नकर्ता :** तीर्थंकरांच्या वेळी तसे होत असे ना?

**दादाश्री :** हो. आणि त्या तीर्थंकरांबद्दल तर काय बोलावे? कुठे ते पुरुष! तीर्थंकरांच्या एकाच वाक्याला जरी समजले असते ना, एकच वाक्य, तरी संपूर्ण जगाने आज त्यांची पूजा केली असती. पण ते वाक्य त्यांना समजतच नाही ना! आणि कोणी समजावणारा सुद्धा नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण आहात ना?

**दादाश्री :** माझ्या एकट्याची पिपाणी कशी वाजेल?

## ज्ञानी पुरुषांच्या अहिंसेचा प्रताप

ज्ञानी पुरुषांचा व्यवहार कसा असतो? इतका अहिंसक असतो की, मोठमोठे वाघ पण लाजतील. मोठमोठे वाघ बसले असतील तरी ते गारठतील. त्यांना सर्दी होऊन जाईल, खरोखरची सर्दी होईल ना! कारण तो अहिंसेचा प्रताप आहे. आणि हिंसेचा प्रताप तर जगाने पाहिलाच आहे ना! हा हिटलर, चर्चिल या सगळ्यांचा प्रताप पाहिलाच ना? शेवटी काय घडले? विनाशालाच आमंत्रण दिले. हिंसा, हे विनाशी तत्त्व आहे आणि अहिंसा हे अविनाशी तत्त्व आहे.

## अहिंसा, तिथे हिंसा नसते

**प्रश्नकर्ता :** अहिंसा असते तिथे हिंसा असते का?

**दादाश्री :** जिथे संपूर्ण अहिंसा असते तिथे हिंसा नसते. ती मग आंशिक अहिंसा म्हटली जाते. पण जर संपूर्ण अहिंसा असेल, त्यात हिंसा नसतेच. पपईच्या जेवढया स्लाइसीस् पाडल्या त्या सर्व पपईमयच असतात, त्यात एकही कडू निघणार नाही. म्हणजे स्लाइस एकाच प्रकारची असते, म्हणून अहिंसेत हिंसा नसते आणि संपूर्ण हिंसा असते तिथे अहिंसाही नसते. पण आंशिक हिंसा आणि आंशिक अहिंसा ही वेगळी वस्तू आहेत.

**प्रश्नकर्ता :** आंशिक अहिंसेला दया म्हणतात ना?

**दादाश्री :** हो. त्यास दया म्हणतात. दया हे धर्माचे मूळच आहे आणि दयेची पूर्णाहुती तिथे धर्माची पूर्णाहुती होत असते.

## हिंसे-अहिंसेच्या पलीकडे

**प्रश्नकर्ता :** दया असते तिथे निर्दयता असतेच. असे हिंसा आणि अहिंसेच्या बाबतीतही आहे का?

**दादाश्री :** आहे ना! अहिंसा आहे तर हिंसा आहे. हिंसा आहे म्हणून अहिंसाही आहे. पण शेवटी करायचे काय? तर हिंसेतून बाहेर निघून अहिंसेत यायचे, आणि अहिंसेतून सुद्धा बाहेर निघायचे. या द्वंद्वाच्या पलीकडे जायचे आहे. अहिंसा, ही पण सोडायची आहे.

**प्रश्नकर्ता :** अहिंसेच्या पलीकडे ही कोणती स्थिती आहे?

**दादाश्री :** हीच, आता आम्ही हिंसे-अहिंसेच्या पलीकडे आहोत. अहिंसा अहंकाराच्या अधीन आहे. आणि अहंकाराच्या पार ती ही 'आमची' स्थिती! हिंसा-अहिंसा जर मी पाळतो, तर यात पाळणारा अहंकार असतो. म्हणून हिंसा आणि अहिंसेच्या पार, म्हणजे द्वंदाच्या पार झाले तरच ते ज्ञानी म्हटले जातील. सर्व प्रकारच्या द्वंद्वाच्या पार. आपले साधू महाराज खूप दयाळू असतात. पण आत निर्दयता सुद्धा भरलेली असते. दया आहे म्हणून निर्दयता आहे. एका कोपऱ्यात जरी खूप दया आहे, ऐंशी टक्के दया आहे, तर वीस टक्के निर्दयता आहे. अठ्याऐंशी टक्के दया आहे, तर बारा टक्के निर्दयता आहे. शहाण्णव टक्के दया आहे, तर चार टक्के निर्दयता आहे.

**प्रश्नकर्ता :** असे हिंसेतही असते. शहाण्णव टक्के अहिंसा असेल तर चार टक्के हिंसा असते, असे?

**दादाश्री :** एकूण बेरीजच दिसते ना! बेरीज स्वतःच बोलते ना! की अहिंसा शहाण्णव आहे मग बाकी काय राहिले? चार टक्के हिंसा राहिली.

**प्रश्नकर्ता :** मग ती हिंसा कशा प्रकारची असते?

**दादाश्री :** ती अंतिम प्रकारची. स्वतः जाणतो आणि त्याचा निकाल लावतो. झपाट्याने निकाल लावून मुक्त होतो.

## ज्ञानी, हिंसेच्या सागरात संपूर्ण अहिंसक

अरे, आम्हालाच लोक विचारतात की, आपण ज्ञानी असूनही मोटारीत फिरता, मग मोटारीखाली किती तरी जीवहिंसा होत असेल, याची जबाबदारी कोणाची? आता ज्ञानी पुरुष जर संपूर्ण अहिंसक नसतील तर त्यांना ज्ञानी म्हणायचेच कसे? संपूर्ण अहिंसक म्हणजे हिंसेच्या सागरात संपूर्ण अहिंसक! ते म्हणजे ज्ञानी!! त्यांना किंचितमात्र हिंसा लागत नाही.

नंतर ते लोक मला म्हणतात की, 'तुमचे पुस्तक आम्ही वाचले, खूप आनंद देणारे पुस्तक आहे आणि ते आम्हाला अविरोधाभासी वाटले. परंतु आपल्या वर्तनात विरोधाभास वाटतो.' मी म्हणालो, 'कोणत्या वर्तनात विरोधाभास वाटला?' तेव्हा म्हणाले, 'आपण गाडीत फिरता ते.' मी म्हणालो बघा, 'मी तुम्हाला समजावतो, भगवंताने शास्त्रात काय सांगितले आहे, ते आधी समजावतो. मग तुम्हीच न्याय करा.' तेव्हा ते म्हणाले, 'शास्त्रात काय म्हटले आहे?' मी म्हणालो, 'आत्मस्वरूप अशा ज्ञानी पुरुषांची जबाबदारी किती असते? ज्ञानी पुरुषांना देहाचा मालकीपणा नसतो. देहाचा मालकीपणा त्यांनी फाडून टाकला आहे. म्हणजे या पुद्‌गलाचा मालकीपणा त्यांनी फाडून टाकलेला आहे. अर्थात ते स्वतः देहाचे मालक नाहीत. आणि मालकीपणा नसल्यामुळे त्यांना दोष लागत नाही. दुसरे असे की, ज्ञानी पुरुषांना त्याग संभवत नाही.' तेव्हा म्हणाले, 'त्या मालकीपणाविषयी मला समजले नाही.' तेव्हा मी म्हणालो, 'तुम्हाला असे कशामुळे वाटते की, माझ्याकडून हिंसा होईल?' तेव्हा ते म्हणाले. 'माझ्या पायाखाली एखादा जीवजंतू आला तर माझ्याकडून हिंसा झाली असेच म्हटले जाईल ना?' म्हणून मी म्हणालो, 'हा पाय तुमचा आहे म्हणून

हिंसा होते. पण हा पाय माझा नाही. या देहाचे आज तुम्हाला जे करायचे असेल ते तुम्ही करू शकता. या देहाचा मी मालक नाही.' नंतर त्यांनी विचारले, 'हा मालकीपणा आणि अ-मालकीपणा कशास म्हणायचे ते आम्हाला सांगा.' तेव्हा मी म्हणालो, 'मी तुम्हाला एक उदाहरण देऊन समजावतो.'

''एका गावात एक परिसर खूप चांगला आहे, आजुबाजूला दुकाने आणि मध्यभागी पाच हजार फुटाची किमती परिसर. त्याबद्दल कोणीतरी सरकारकडे तक्रार केली की, या जागेत एक्साइजचा माल गाडलेला आहे. म्हणून पोलिस खातेवाले तिथे गेले. नुकताच पावसाळा संपला होता, म्हणून त्या जागेवर सुंदर हिरवळ आणि लहान रोपटी उगवली होती. ती जागा आधी खणून काढली. नंतर दोन-तीन फूट खोल खणले, तेव्हा तिथून तो सर्व एक्साइजचा माल सापडला. तेव्हा फौजदाराने आजुबाजूवाल्यांना विचारले की, 'या जागेचा मालक कोण आहे?' लोकांनी सांगितले, 'ही तर लक्ष्मीचंद शेठची जागा आहे.' नंतर फौजदाराने विचारले की, 'ते कुठे राहतात?' तेव्हा ते अमक्या ठिकाणी राहतात असे त्यांना समजले. म्हणून पोलिसांना तिथे पाठवले की, लक्ष्मीचंद शेठला पकडून आणा. पोलिस लक्ष्मीचंद शेठकडे गेले. तेव्हा लक्ष्मीचंद शेठने त्यांना सांगितले की, भाऊ, ही जागा माझी आहे असे जे तुम्ही म्हणता ते खरे आहे. पण मी ती जागा पंधरा दिवसांपूर्वीच विकून टाकली आहे. आज मी त्या जमिनीचा मालक नाही. तेव्हा त्या पोलिसाने विचारले, कोणाला विकली ते सांगा. तुम्ही त्याचा पुरावा दाखवा. नंतर शेठने पुराव्याची झेरॉक्स प्रत दाखवली. ती प्रत पाहून पोलिस ज्याने जमीन विकत घेतली होती, त्याच्याकडे गेले. त्याला विचारले की, भाऊ ही जागा तुम्ही विकत घेतली आहे का? तेव्हा तो म्हणाला, 'हो, मी विकत घेतली आहे.' पोलिसवाल्याने सांगितले, तुमच्या जमिनीतून असे निघाले आहे. तेव्हा तो म्हणाला, पण मी ही जमीन पंधरा दिवसांपूर्वीच घेतली आहे आणि हा माल तर पावसाळ्यापूर्वीच गाडलेला दिसत आहे, त्यात माझा काय गुन्हा?

तेव्हा पोलिसवाला म्हणाला, 'ते आम्ही बघत नाही. आम्ही फक्त हेच बघतो की, हु इज द ओनर नाऊ? आज कोण मालक आहे?' आज मालकीपणा नसेल तर जोखीमदार नाही. मालक आहे तर जोखीम आहे.''

म्हणजे ते लोक सुद्धा समजून गेले. जरी पंधरा दिवसांपूर्वी घेतली तरी जोखीमदार तर झालाच ना? बाकी, असे बुद्धीने पाहायला गेलो तर तो माल तिथे पावसाळ्यापूर्वीच गाडलेला होता.

आता जर इतक्या बारकाईने समजेल तर उलगडा होईल. नाही तर उलगडा होईलच कसा? हे तर पझल (कोडे) आहे. द वर्ल्ड इज द पझल इटसेल्फ. हे पझल कसे सॉल्व करता येईल? देर आर टु व्ह्यू पॉइंटस टु सॉल्व धीस पझल. वन रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट, वन रियल व्ह्यू पॉइंट. या जगात जर पझल सॉल्व केले नाही तर तो या पझलमध्येच डिजॉल्व झालेला आहे. संपूर्ण जग, सर्वच या पझलमध्ये डिजॉल्व झालेले आहेत.

**प्रश्नकर्ता :** असा अर्थ काढून तर सगळे लोक मजाच करतील ना, की मी तर मालकच नाही, असे म्हणून आणि मग तर सगळेच अशा प्रकारे सांगून दुरुपयोग करतील ना?

**दादाश्री :** मालक नाही असे कोणी सांगतच नाही. नाही तर आता एक चापट जरी मारली ना, तरीही मालक होऊन जाईल! शिव्या दिल्या तरीही मालक होऊन जाईल, लगेचच भांडायला उभा राहील. म्हणून आपण समजावे की हा मालक आहे. मालक आहे की नाही याचा पुरावा लगेच मिळतो ना! त्याचे टाईटल दिसूनच येते की, हा मालक आहे की नाही? शिव्या दिल्या तर लगेच टाईटल दाखवतो की नाही? वेळच नाही लागत. बाकी, असे तोंडी बोलल्याने काहीही निष्पन्न होते का?

**प्रश्नकर्ता :** पण या गाड्यांमधून फिरतात त्यात पाप नाही का?

**दादाश्री :** खरे तर, हे सर्व जग निव्वळ पापमयच आहे. तो जेव्हा या देहाचा मालक नसेल तेव्हाच निष्पापी होईल, नाही तर जोपर्यंत या देहाचा मालक आहे तोपर्यंत सर्व पापच आहे.

आपण श्वास घेतो तेव्हा कितीतरी जीव मरतात आणि श्वास सोडतो तेव्हाही कितीतरी जीव मरतात. आपण असेच फक्त चालतो तेव्हा देखील कितीतरी जीवांना आपला धक्का लागत असतो, आणि ते मरत राहतात. आपण फक्त हात असा वर-खाली केला तरीही जीव मरतात. तसे ते जीव आपल्याला दिसत नाहीत तरीही जीव मरत राहतात.

म्हणजे हे सर्व पापच आहे. पण हा देह म्हणजे मी नाही असे जेव्हा भान होईल, जेव्हा देहाचा मालकीपणा नसेल, तेव्हा स्वतः निष्पाप होईल. मी सव्वीस वर्षांपासून या देहाचा मालक नाही. या मनाचा मालक नाही, वाणीचा मालक नाही. मालकीभावाचे दस्तावेजच मी फाडून टाकले आहेत, म्हणून मग त्याची जबाबदारीच नाही ना! अर्थात जिथे मालकीभाव आहे तिथे गुन्हा लागू होतो. मालकीभाव नाही तिथे गुन्हा नाही. म्हणून तर आम्ही संपूर्ण अहिंसक म्हटले जातो. कारण आम्ही आत्म्यातच राहतो. होम डिपार्टमेंटमध्येच राहतो आणि फॉरेनमध्ये हात घालतच नाही. पूर्ण हिंसेच्या समुद्रात आम्ही संपूर्ण अहिंसक आहोत.

**प्रश्नकर्ता :** हे 'ज्ञान' घेतल्यानंतर अहिंसक होतात का?

**दादाश्री :** हे ज्ञान तर मी तुम्हाला दिले आहे, तुम्हाला पुरुष बनवले आहे. आता आमची आज्ञा पाळल्याने तुम्हाला हिंसा स्पर्शत नाही. तुम्ही पुरुषार्थ केला तर तो तुमचा. पुरुषार्थ कराल तर पुरुषोत्तम व्हाल, नाही तर पुरुष तर तुम्ही आहातच. म्हणजे आमची आज्ञा पाळणे हा पुरुषार्थ आहे. अहिंसकाला हिंसा कशी शिवेल?

**प्रश्नकर्ता :** नऊ कलमे जो अनुभवास आणेल, त्याला हिंसा नडतच नाही.

**दादाश्री :** हो, त्यालाही हिंसा नडते. पण नऊ कलमे बोलल्याने आत्तापर्यंत जी हिंसा झालेली असते ती धुतली जाते. पण ह्या पाच आज्ञा जो पाळतो ना, त्याला तर हिंसा स्पर्शतच नाही. हिंसेच्या समुद्रात फिरतो. संपूर्ण समुद्रच हिंसेचा आहे. हा हात वर केला तरी कितीतरी जीव मरतात. हे जग पूर्णपणे जीवांनीच भरलेले आहे. पण आमच्या पाच आज्ञा पाळतो त्याक्षणी तो ह्या देहात नसतो. आणि देह स्थूल असल्याने इतर जीवांना ते दु:खदायी बनते. आत्मा सूक्ष्म असल्याने कोणाचेही नुकसान करीत नाही. म्हणून आम्ही आमच्या पुस्तकात स्पष्ट लिहिले आहे की, आम्ही हिंसेच्या सागरात संपूर्णपणे अहिंसक आहोत. सागर तर हिंसेचा आहे पण त्यात आम्ही संपूर्ण अहिंसक आहोत. आमचे मन तर हिंसक नाहीच. परंतु वाणी जरा काही ठिकाणी हिंसक आहे, पण ती टेपरेकॉर्ड आहे. आम्हाला तिचा मालकीपणा नाही. तरी पण टेपरेकॉर्ड तर आमचीच म्हणून तेवढ्यापुरता आमचा गुन्हा आहे. त्याची प्रतिक्रमण आम्हाला करावे लागतात. पूर्वीची चूक तर आमचीच होती ना! हु इज द ओनर? तेव्हा आम्ही म्हणू की 'वी आर नॉट द ओनर.' तुम्ही म्हणाल पूर्वीचे ओनर आहात. मधल्या काळात तुम्ही विकली नव्हती, मधल्या काळात विकली असती तर गोष्ट वेगळी होती.

**प्रश्नकर्ता :** दादा, तुमच्या अहिंसक वाणीने आम्ही सर्व महात्मा अहिंसक होत चाललो आहोत.

**दादाश्री :** आमच्या आज्ञेचे पालन केलेत तर तुम्ही अहिंसक आहात, इतके सुंदर तर मी सांगतो, मग काय? आणि जर आज्ञा कठीण असेल तर सांगा, मी बदलून टाकतो.

## संपूर्ण अहिंसा तिथे प्रकटते केवलज्ञान

म्हणजे उच्च प्रकारचा धर्म कोणता की, जिथे सूक्ष्म भेदाने अहिंसा समजली असेल. संपूर्ण अहिंसा म्हणजे केवलज्ञान! हिंसा बंद झाली तर, समजावे की इथे खरा धर्म आहे.

हिंसेशिवाय जग नाहीच, संपूर्ण जग हिंसामयच आहे. जेव्हा तुम्ही स्वत:च अहिंसक व्हाल तेव्हा जगसुद्धा अहिंसक होईल. आणि अहिंसेच्या साम्राज्याशिवाय कधीच केवलज्ञान होत नाही, जी जागृती आहे ती पूर्णपणे येणार नाही. हिंसा नावालाही नसावी. हिंसा कोणाची करता? हे सर्व परमात्माच आहेत, जीवमात्रात परमात्माच आहेत. कोणाची हिंसा कराल? कोणाला दु:ख द्याल?

## चरम अहिंसेचे विज्ञान

जोपर्यंत तुम्हाला असे वाटते की 'मी फूल तोडत आहे, मला हिंसा लागत आहे.' तोपर्यंत तुम्हाला हिंसा लागेल. आणि जो हे जाणत नाहीत, त्यांनाही हिंसा लागते. परंतु हे जाणून जे तोडतात, तरी पण ते स्वत: स्वभावात आलेले आहेत, म्हणून त्यांना हिंसा लागत नाही.

कारण असे आहे ना की, भरत राजाला तेराशे राण्यांसोबत सुद्धा, युद्ध करत असतानासुद्धा ज्ञान हजर राहत असे. तेव्हा ते अध्यात्म कसे असेल? आणि या लोकांना तर एकच राणी असते तरीही राहत नाही. भरत राजाने ॠषभदेव भगवंताना सांगितले, 'भगवंत, मी हे युद्ध करतो आणि कित्येक जीवांची हिंसा होते आणि ही तर मनुष्यांची हिंसा होते, इतर लहान जीवांची हिंसा झाली असती तर ठीक आहे पण ही तर मनुष्य हिंसा! आणि तेही युद्ध करतो म्हणूनच होते ना!' त्यावर भगवंतांनी सांगितले, 'हा सर्व तुझा हिशोब आहे आणि तो तुला चुकता करायचा आहे.' तेव्हा भरत राजे म्हणतात, 'पण मलाही मोक्षास जायचे आहे, मला काही इथे बसून राहायचे नाही.' तेव्हा भगवंत म्हणतात, 'आम्ही तुला अक्रम विज्ञान देत आहोत, ते तुला मोक्षाला घेऊन जाईल. म्हणजे स्त्रियांसोबत राहूनसुद्धा, युद्ध करूनसुद्धा काही स्पर्शणार नाही. निर्लेप राहू शकेल, असंग राहू शकेल, असे ज्ञान आम्ही देत आहोत.'

## शंका तोपर्यंत दोष

या ज्ञानानंतर 'स्वत:' शुद्धात्मा होऊन गेला. आता दरअसल

(मूळ) शुद्धात्मा समजल्यावर कोणत्याही प्रकारची हिंसा किंवा काही पण अशुभ केले, ते स्वत:च्या गुणधर्मात येतच नाही. त्याला शुद्धात्म्याचे लक्ष्य पूर्णपणे आहे. पण अजून जोपर्यंत स्वत:ला शंका वाटते की मला दोष लागला असेल माझ्याकडून जीव मारला गेला आणि मला त्याचा दोष लागला. अशी शंका वाटत असेल तोपर्यंत सकाळच्या प्रहरी स्वत: निश्चय करून निघावे. 'माझ्या मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख न होवो' असे पाच वेळा बोलून निघा, असे 'आपण' 'चंदुभाऊ' (स्वत:)कडून बोलवून घ्यावे. म्हणजे आपण जरा असे म्हणावे की चंदुभाऊ, बोला, सकाळी उठल्याबरोबरच बोला, 'मन-वचन-कायेने कोणत्याही जीवाला किंचितमात्र दु:ख न होवो, ही आमची दृढ प्रतिज्ञा आहे.' आणि असे 'दादा भगवानांच्या साक्षीने बोलून निघालात की मग सर्व जबाबदारी दादा भगवानांची.'

आणि जर शंका वाटत नसेल तर काही हरकत नाही. आम्हाला शंका वाटत नाही आणि तुम्हाला शंका वाटते ते साहजिक आहे. कारण तुम्हाला हे ज्ञान दिले गेले आहे. एका माणसाने स्वत: कमावून लक्ष्मी जमा केली असेल आणि एका माणसाला लक्ष्मी (दुसऱ्यांकडून) दिली गेली असेल, तर त्या दोघांच्या व्यवहारात खूप फरक असतो.

खरोखर तर ज्ञानी पुरुषांनी जो आत्मा जाणला आहे ना, तो आत्मा तर कोणालाही किंचितमात्र दु:ख देत नाही, असा आहे, आणि कोणी त्याला किंचितमात्र दु:ख देऊ शकत नाही, असा आहे. खरोखर तर मूळ आत्मा असा आहे.

## वेदक-निर्वेदक-स्वसंवेदक

एक माणूस मला विचारत होता. तो मला म्हणाला, 'डास चावतात ते कसे परवडेल?' तेव्हा मी सांगितले, 'ध्यानात बैस. डास चावला तर पाहत रहा.' त्यावर तो म्हणाला, 'ते तर सहन होत नाही.' मी म्हणालो, 'असे बोल की मी निर्वेद आहे. आता वेदक

स्वभाव माझा नाही, मी तर निर्वेद आहे. म्हणजे थोडया अंशाने तरी तू पुन्हा तुझ्या होम डिपार्टमेंटकडे आलास. असे करत-करत शंभर-दोनशे वेळा तुला डास चावतील, मग असे करत-करत तू स्वतः निर्वेद होऊन जाशील.' निर्वेद म्हणजे काय? फक्त जाणणारा, की 'डास' या इथे चावला.' स्वतः वेदले नाही, ते निर्वेद! खरोखर स्वतः वेदतच नाही पण वेदतो हा पूर्वीचा अभ्यास आहे. पूर्वीचा अभ्यास आहे म्हणून तो बोलतो की 'हा मला चावला.' खरोखर तर स्वतः निर्वेदच आहे. पण तुम्ही ह्या सत्संगात बसून-बसून हे पद समजून घ्यावे, हे संपूर्ण पद समजून घ्यावे की आत्मा खरोखर असा आहे. तेव्हा आता तर आपण शुद्धात्मा पदाने चालवून घ्यायचे. इतके बोलला तरी त्याचे कर्म बांधण्याचे थांबले. त्या आरोपित भावापासून सुटला म्हणून कर्म बांधण्याचे थांबले.

**प्रश्नकर्ता :** डास चावला असेल तरीही 'मी वेदक नाही' असे म्हणायचे?

**दादाश्री :** हो, तुम्ही असे बसले असाल आणि इथे हातावर डास बसला. म्हणजे 'बसला' असा आधी तुम्हाला अनुभव होतो. ते तुम्ही जाणता. डास बसला त्यावेळी तुम्हाला जाणपणा असतो की वेदकपणा असतो? तुम्हाला काय वाटते?

**प्रश्नकर्ता :** डास बसतो तेव्हा तर जाणपणाच असतो.

**दादाश्री :** हो, नंतर तो डंख करतो त्यावेळी सुद्धा जाणपणाच असतो. पण मग 'मला डास चावला, मला चावला' असे म्हणतो, म्हणून तो वेदक होतो. आता खरोखर तर तो निर्वेद आहे, म्हणून डास चावतो त्यावेळी आपण म्हणावे की, 'मी तर निर्वेद आहे.' नंतर डंख आत खोलवर जातो तेव्हा आपण पुन्हा म्हणावे की, 'मी निर्वेद आहे.'

**प्रश्नकर्ता :** आता आपण निर्वेदबद्दल बोललात. पण दुसरा एक शब्द वापरला आहे की स्वसंवेदन असते.

**दादाश्री :** स्वसंवेदन तर बोलू शकत नाही. ती तर खूप उच्च वस्तू आहे. स्वसंवेदन ही तर अंतिम गोष्ट आहे. आता तर आपण 'मी निर्वेद आहे' असे बोलावे की ज्यामुळे वेदना कमी होतील. माझे म्हणणे असे आहे की, तरीही वेदना एकदम जात नाहीत. आणि स्वसंवेदन म्हणजे तर 'ज्ञान'च झाले. त्यास फक्त 'जाणतो'च! जरी डंख लागला, जबरदस्त डंख लागला तरीही त्यास जाणतच राहतो, वेदतच नाही. याला स्वसंवेदन म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** पण डास चावला आणि त्याची जी प्रतिक्रिया झाली की 'मला हा डास चावला.' त्या प्रतिक्रियेलाही स्वसंवेदनात जाणतो?

**दादाश्री :** हो, त्यासही जाणतो.

**प्रश्नकर्ता :** पण आपण सांगितले की, 'मी वेदत नाही. वेदत नाही' म्हणजे लोक असे समजतात की वेदनता (वेदना) निघून गेली.

**दादाश्री :** नाही, असे नाही. वेदनतेला (वेदनेला) सुद्धा तो जाणतो. परंतु माणसाची एवढी क्षमता नाही. म्हणून 'मी निर्वेद आहे' असे बोल ना, मग त्याचा परिणाम होणार नाही. 'आत्म्याचा' स्वभाव निर्वेद आहे. हे बोलल्याने 'त्याच्यावर' काही परिणाम होत नाही. परंतु स्वसंवेदन ही खूप उच्च वस्तू आहे. तो जर जाणत राहिला तर स्वसंवेदनमध्ये जातो. त्यात तर त्याने फक्त जाणावे की हा डंख लागला. त्यास जाणले. नंतर हा डंख उडून गेला त्यासही जाणले. असे करत-करत स्वसंवेदनात जातो. पण निर्वेद ही तर एक स्टेप आहे की बेचैन झाल्याशिवाय तो सहन करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** आत्माच स्वत: स्वसंवेदनाने जाणला जातो ना?

**दादाश्री :** आत्मा स्वत: स्वसंवेदनच आहे. पण तुम्ही 'हे' ज्ञान घेतले आहे तरी पण तुमचा मागील अहंकार आणि ममता अजून जात नाही ना!

**प्रश्नकर्ता :** स्वसंवेदनशील आहे, त्याचे दर्शन समग्र असते ना?

**दादाश्री :** समग्र असते. पण अजून अशी दशा या काळात होईल असे नाही. म्हणून स्वसंवेदनही तितके कच्चे राहते. या काळात संपूर्ण स्वसंवेदन होऊ शकत नाही. समग्र दशा तर जेव्हा केवलज्ञान होते तेव्हा होते.

## 'लाईट'ला चिखल रंगवू शकतो?

तुम्हाला आत्म्याच्या प्रकाशाबद्दल काहीच माहीत नसेल ना? या गाडयांच्या लाईटचा प्रकाश जर या बांद्राच्या खाडीत गेला, तर त्या प्रकाशाला तो वास स्पर्श करील, की नाही? किंवा त्या प्रकाशाला खाडीचा रंग लागेल की नाही?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** तो चिखलाने माखेल का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** हा प्रकाश चिखलाला स्पर्श करतो, पण चिखल त्याला स्पर्श करत नाही. तर या गाडीचा प्रकाश असा आहे, मग आत्म्याचा प्रकाश कसा असेल! त्यावर कुठेही लेप चढतच नाही. म्हणून आत्मा निरंतर निर्लेपच असतो, असंगच राहतो. काही स्पर्शतच नाही, चिकटतच नाही असा आत्मा आहे.

म्हणजे आत्मा तर प्रकाश स्वरूप आहे पण तो असा प्रकाश नाही. तो प्रकाश मी पाहिला आहे, तो प्रकाश आहे. या गाडीच्या लाईटच्या प्रकाशाला तर भिंत अडवते. भिंत जर मधे आली तर प्रकाश अडवला जातो. 'तो' (आत्म्याचा) प्रकाश भिंतीमुळे अडवला जाईल असा नाही. फक्त हे पुद्‌गलच असे आहे की त्याच्यामुळे तो अडवला जातो. भिंतीने तो अडवला जाऊ शकत नाही. मधे डोंगर असेल तरीही तो अडवला जाऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** पुद्‌गलाकडून तो कसा काय अडवला जातो?

**दादाश्री :** हे पुद्‌गल आहे ना, ते आत मिश्रचेतन आहे. जर जड असते ना, तर प्रकाश अडवला गेला नसता. पण हे मिश्रचेतन आहे म्हणून तो अडवला जातो.

**प्रश्नकर्ता :** आपण या खाडीचे आणि प्रकाशाचे जे उदाहरण दिले ते अगदी अचूक आहे.

**दादाश्री :** हो, पण हे उदाहरण आम्ही एखादे दिवशीच देतो नाही तर देऊ शकत नाही. हे उदाहरण सगळ्यांना देता येत नाही. नाही तर लोक उलट मार्गी लागतील.

## नाही स्पर्शत हिंसा, आत्मस्वरूपीला

आता या रोडवर चंद्राचा उजेड असेल आणि गाडीला जर पुढचा लाईट नसेल, तर लोक गाडी चालवतात की नाही?

**प्रश्नकर्ता :** चालवतात.

**दादाश्री :** तेव्हा त्यांना कुठलीही शंका वाटत नाही. पण जर पुढचा लाईट असेल तर शंका येते. बाहेर पुढचा लाईट असेल तर त्या प्रकाशात त्याला दिसते की अरेरे, इतके सारे जीवजंतू फिरत आहेत आणि ते सर्व गाडीवर आपटून मरत आहेत. पण मग तिथे त्याला शंका वाटते की मी जीवहिंसा केली.

हो, लोकांना तर लाईट नाममात्रही नाही, म्हणून त्यांना जीवजंतू दिसतच नाहीत. त्यामुळे त्यांना या बाबतीत शंका होतच नाही. आपल्याकडून जीव मारले जात आहेत असे समजतच नाही ना! पण ज्याचा जितका प्रकाश वाढतो तितके जीव दिसू लागतात. जसजसा लाईट वाढत जातो तसतसे लाईटच्या उजेडात जीवजंतू दिसण्याचे प्रमाण वाढते की, जीवजंतू गाडीवर आपटून मरत आहेत. त्याचप्रमाणे जशी जागृती वाढत जाते तसतसे स्वत:चे दोष दिसू लागतात. नाही तर लोकांना तर स्वत:चे दोष दिसतच नाहीत ना? आत्मा हा लाईट

स्वरूप आहे, प्रकाश स्वरूप आहे, त्या आत्म्याला स्पर्शून कोणत्याही जीवाला काहीच दुःख होत नाही. कारण जीवांच्याही आरपार निघून जाईल असा आत्मा आहे. जीव स्थूल आहेत आणि आत्मा सूक्ष्मतम आहे. हा 'आत्मा' अहिंसकच आहे. जर त्या आत्म्यात राहिलात तर 'तुम्ही' अहिंसकच आहात. आणि जर देहाचे मालक व्हाल तर हिंसक आहात. तो आत्मा जाणण्यासारखा आहे. अशा आत्म्याला जाणल्यानंतर मग त्याला दोष कसा लागेल? हिंसा कशी स्पर्शेल? म्हणूनच आत्मस्वरूप झाल्यानंतर कर्मे बांधली जातच नाहीत.

**प्रश्नकर्ता :** मग जरी जीवहिंसा केली तरीही कर्म बांधले जात नाहीत?

**दादाश्री :** हिंसा होतच नाही ना! 'आत्मस्वरूपाने' हिंसाच होत नाही. जो 'आत्मस्वरूप' झाला, त्याच्याकडून हिंसा होणारच नाही.

म्हणून आत्मज्ञान झाल्यानंतर कोणतेच नियम स्पर्शत नाही. जोपर्यंत देहाध्यास आहे तोपर्यंत सर्व नियम आहेत, आणि तोपर्यंतच सर्व कर्मे बांधली जातात. आत्मज्ञान झाल्यानंतर कोणत्याही शास्त्राचा नियम स्पर्शत नाही, कर्म स्पर्शत नाही, हिंसा वगैरे काहीच स्पर्शत नाही.

**प्रश्नकर्ता :** अहिंसा धर्म कसा आहे? स्वयंभू?

**दादाश्री :** स्वयंभू नाही. पण अहिंसा हा आत्म्याचा स्वभाव आहे आणि हिंसा हा आत्म्याचा विभाव आहे. पण हा खरोखर स्वभाव नाही. आत कायमसाठी राहणारा स्वभाव नाही हा. कारण असे जर मोजायला गेलो तर असे खूप सारे स्वभाव असतात. म्हणजे हे सर्व द्वंद्व आहेत.

म्हणजे गोष्ट समजण्याचीच गरज आहे. हे 'अक्रम विज्ञान' आहे. हे वीतरागांचे, चोवीस तीर्थंकरांचे विज्ञान आहे! पण तुम्ही हे कधी ऐकले नाही, म्हणून तुम्हाला आश्चर्य वाटते की, हे काय असे

नवीन प्रकारचे असू शकते का? म्हणून मग भीती शिरते आणि भीती शिरली की मग कार्य होत नाही. भीती निघाली तरच कार्य होईल ना!

ते आत्मस्वरूप तर इतके सूक्ष्म आहे की अग्नीच्या आरपार निघून गेले तरीही काही होणार नाही. बोला आता, तिथे मग हिंसा कशी स्पर्शेल? हे तर स्वतःचे स्वरूप स्थूल आहे, असा देहाध्यास असलेला स्वभाव आहे म्हणून त्याला हिंसा स्पर्श करते. म्हणजे जर आत्मस्वरूपाला हिंसा स्पर्शत असेल, असे जर होत असेल मग तर कोणी मोक्षालाच जाणारच नाही. पण मोक्षाची तर खूप सुंदर व्यवस्था आहे. हे तर आता तुम्ही ज्या जागेवर बसला आहात तिथून या सर्व गोष्टी समजणार नाहीत, स्वतः आत्मस्वरूप झाल्यानंतर सर्व समजते, विज्ञान उघड होते!

**जय सच्चिदानंद**

# नऊ कलमे

## ( दररोज तीन वेळा बोलावी )

१. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा किंचितमात्रही अहम् दुभावणार (दुखावणार) नाही, दुभवविला जाणार नाही किंवा दुभविण्याप्रति अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा किंचितमात्रही अहम् दुभावणार नाही अशी स्याद्वाद वाणी, स्याद्वाद वर्तन आणि स्याद्वाद मनन करण्याची परम शक्ती द्या.

२. हे दादा भगवान! मला, कोणत्याही धर्माचे किंचितमात्रही प्रमाण दुभावणार नाही, दुभवविले जाणार नाही किंवा दुभविण्याप्रति अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

मला, कोणत्याही धर्माचे किंचितमात्रही प्रमाण दुभावले जाणार नाही, अशी स्याद्वाद वाणी, स्याद्वाद वर्तन आणि स्याद्वाद मनन करण्याची परम शक्ती द्या.

३. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी उपदेशक, साधू, साध्वी किंवा आचार्य, यांचा अवर्णवाद, अपराध, अविनय न करण्याची परम शक्ती द्या.

४. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याप्रति किंचितमात्रही अभाव, तिरस्कार कधीही केला जाणार नाही, करविला जाणार नाही किंवा कर्त्याप्रति अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

५. हे दादा भगवान! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याशी कधीही कठोर भाषा, तंतीली (टोचणारी) भाषा न बोलण्याची, न बोलवविण्याची किंवा बोलण्याप्रति अनुमोदन न देण्याची परम शक्ती द्या.

कोणी कठोर भाषा, तंतीली भाषा बोलले तरी मला मृदु-ऋजु भाषा बोलण्याची परम शक्ती द्या.

६. हे दादा भगवान ! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याप्रति, स्त्री-पुरुष किंवा नपुंसक, कोणताही लिंगधारी असो, तर त्यांच्या संबंधी किंचितमात्र पण विषयविकार संबंधी दोष, इच्छा, चेष्टा-चाळे किंवा विचार संबंधी दोष न करण्याची, न करविण्याची किंवा कर्त्याप्रति अनुमोदन न देण्याची परम शक्ती द्या.

मला निरंतर निर्विकार राहण्याची परम शक्ती द्या.

७. हे दादा भगवान! मला, कोणत्याही रसात लुब्ध न होण्याची शक्ती द्या. समरसी आहार घेण्याची परम शक्ती द्या.

८. हे दादा भगवान ! मला, कोणत्याही देहधारी जीवात्म्याचा प्रत्यक्ष किंवा परोक्ष, जिवंत किंवा मृत्यू पावलेल्या, कोणाचाही किंचितमात्रही अवर्णवाद, अपराध, अविनय केला जाणार नाही, करविला जाणार नाही किंवा कर्त्याप्रति अनुमोदन दिले जाणार नाही, अशी परम शक्ती द्या.

९. हे दादा भगवान! मला जगत कल्याण करण्याचे निमित्त बनण्याची परम शक्ती द्या, शक्ती द्या, शक्ती द्या.

(एवढेच तुम्ही 'दादा भगवान' यांच्याजवळ मागायचे. ही दररोज यंत्रवत् वाचण्याची वस्तू नाही, हृदयात ठेवण्याची वस्तू आहे. ही दररोज उपयोगपूर्वक भावना करण्याची वस्तू आहे. एवढ्या पाठात सर्व शास्त्रांचे सार येऊन जाते.)



## प्रतिक्रमण विधी

प्रत्यक्ष 'दादा भगवानांच्या' साक्षीने देहधारी...... ( ज्याच्या प्रती दोष झाला असेल त्या व्यक्तीचे नाव ) च्या मन-वचन-कायेचे योग, भावकर्म, द्रव्यकर्म, नोकर्माहून भिन्न असे हे शुद्धात्मा भगवान! आपल्या साक्षीने, आजच्या दिवसापर्यंत माझ्याकडून जे जे ★★ दोष झाले आहेत, त्यांची क्षमा मागत आहे, हृदयपूर्वक खूप पश्चात्ताप करीत आहे. मला क्षमा करा, क्षमा करा, क्षमा करा. आणि पुन्हा असे दोष कधीही करणार नाही, असा दृढ निश्चय करीत आहे, त्यासाठी मला परम शक्ती द्या.

★★( आयुष्यभरात क्रोध-मान-माया-लोभ, विषय-विकार, कषाय इत्यादीपासून त्या व्यक्तीला जे जे दुःख दिले गेले असेल, त्या सर्व दोषांना मनात आठवावे. )

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन** : +91 79 3500 2100, +91 9328661166/77
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | 9810098564 | **बेंगलूर** | 9590979099 |
| **कोलकता** | 9830093230 | **हैदराबाद** | 9885058771 |
| **चेन्नई** | 7200740000 | **पूणे** | 7218473468 |
| **जयपुर** | 8890357990 | **जलंधर** | 9814063043 |
| **भोपाल** | 6354602399 | **चंडीगढ** | 9780732237 |
| **इन्दौर** | 6354602400 | **कानपुर** | 9452525981 |
| **रायपुर** | 9329644433 | **सांगली** | 9423870798 |
| **पटना** | 7352723132 | **भुवनेश्वर** | 8763073111 |
| **अमरावती** | 9422915064 | **वाराणसी** | 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 759-92-DADA (3232)

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 402179706

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 91457800

**www.dadabhagwan.org**



## संपूर्ण अहिंसा, तिथे प्रकटते केवलज्ञान

हिंसेशिवाय जग नसतेच. तुम्ही स्वतःच जेव्हा अहिंसक व्हाल तेव्हा जग अहिंसक होईल आणि अहिंसेच्या साम्राज्यशिवाय कधीच केवलज्ञान होत नाही, जी जागृती आहे, ती पूर्णपणे येणार नाही. हिंसा नावालाही नसावी. प्रत्येक जीवमात्रात परमात्माच आहे, कोणाची हिंसा कराल ? कोणाला दुःख द्याल ?

- दादाश्री



dadabhagwan.org




Printed in India

Price ₹50